# कवींद्र

# रवींद्रनाथ टागोर






किंमत ६ आणे. ] [ लेखक—रा. प्र. कानिटकर.



णोनि
कर्तृत्व
जितुकें
झालें
तितुकें
शारदागुणें.



रामदास.

# कवींद्र रवींद्रनाथ टागोर.

(संक्षिप्तचरित्र व कार्यपरिचय)

लेखक -
राजाराम प्रल्हाद कानिटकर
एम्. ए.



फेब्रुवारी १९३२
चित्रशाळा प्रेस, पुणें, नं. २
किंमत ६ आणे.

# प्रस्तावना.

जगत्कवि डॉ. रवींद्रनाथ टागोर यांच्या सत्तराव्या वाढदिवसानिमित्त त्यांना हें छोटेसें चरित्रपुष्प समर्पण करतांना मनाला समाधान होत आहे. हें समाधान विशेषतः हिंदी महाकवीच्या गुणगौरवाच्या दृष्टीनें कर्तव्यपूर्तीचे द्योतक आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. त्यांचा विश्वबंधुत्वाचा संदेश व त्यांच्या विश्वभारतीची विश्वैक्याची घोषणा हीं सबंध जगांत दुमदुमलीं आहेत. त्यांच्या त्रिखंडविख्यात काव्याइतकाच त्यांचा विश्वबंधुत्वाचा संदेश तेजस्वी व शक्तिगर्भ आहे. त्यांच्या काव्यानें जग जितकें भारलें गेलें आहे त्यापेक्षां तें त्यांच्या जागतिक संस्कृतीच्या एकीकरणाच्या कल्पनेनें अधिक आकृष्ट झालें आहे. तथापि शांतियुगाचे प्रेषित या नात्यानें त्यांनीं कितीही चिरस्मरणीय कामगिरी केली असली आणि ते करीत असले तरी तरी 'कवींद्र' म्हणूनच त्यांचें नांव चिरंजीव होऊन राहील यांत शंका नाहीं. हिंदुस्थानाचें नांव सबंध जगांत उज्ज्वलित करण्यांत त्यांच्या हातून जी अलौकिक कामगिरी झाली आहे त्याबद्दल हिंदी जनतेनें त्यांचे सदैव ऋणी राहिलें पाहिजे. असो.

चरित्रांत आत्मचरित्र हें श्रेष्ठ असलें तरी त्यांत चरित्रनायकाच्या जीविताच्या सर्व कक्षा यथातथ्यतेनें रेखाटल्या जात नसल्यामुळें सर्वांगीण व संपूर्ण जीवनकथेच्या दृष्टीनें तें कमी प्रतीचेंच ठरतें. त्याच्या उलट दुसऱ्यांनीं लिहिलेलीं चरित्रें चरित्रनायकाचें व्यक्तित्व यथार्थतेनें चित्रित करण्याच्या दृष्टीनें 'चरित्र' या नांवाला पात्र होत नाहींत. ह्या दोघांचा समन्वय झाल्याशिवाय खरें चरित्र निर्माण होऊं शकत नाहीं. व्यक्तीच्या कर्तृत्वाचें स्वरूप यथातथ्यतेनें रंगविण्यास चरित्रकाराला मोठेसे प्रयास पडत नाहींत, पण व्यक्तीचें जीवितध्येय व व्यक्तीचा संदेश या गोष्टी प्रत्यक्ष व्यक्तीच्याच तोंडून ऐकल्याशिवाय वाचकाचें समाधान होत नाहीं. व्यक्तीची आणि तिच्या जीवितकार्याची ( Man and his mission ) ओळख करून देणें हें चरित्राचें उद्दिष्ट आहे, ही गोष्ट

## प्रस्तावना

अनेकदां दृष्टीआड झाल्यामुळें मराठींत खरीं चरित्रें अशीं अजून तरी फारशीं निर्माणच झालीं नाहींत असें मोठ्या खेदानें म्हणावें लागतें. चरित्र म्हणजे चरित्रनायकाच्या आयुष्याचा शकावलीवजा इतिहास नव्हे किंवा त्याच्या जीवनकार्याशीं निगडित झालेल्या एकंदर कालखंडाचा इतिहास नव्हे, किंवा त्याचीं पत्रें, संकीर्ण टिपणें व्याख्यानें इत्यादिकांचा संग्रहही नव्हे, ही गोष्ट ध्यानांत ठेवली पाहिजे. चरित्र वाचतांना आप-ल्याला चरित्रनायकाच्या अंतरंगाचा परिचय होत आहे असें वाचकास वाटलें पाहिजे, व चरित्रनायकासंबंधांत त्याची आत्मीयत्वाची भावना उत्पन्न झाली पाहिजे.

प्रस्तुत चरित्र वर निर्दिष्ट केलेल्या विशिष्ट पद्धतीनें लिहिण्यांत आलें आहे, हें वाचकांच्या ध्यानांत येईलच. व्यक्ती आणि तिचें जीवितकार्य यांची ओळख करून देणें हा ह्या चरित्राचा मुख्य उद्देश आहे. विद्वान व चिकित्सक वाचकांनीं हा उद्देश साध्य झाल्याची ग्वाही दिल्यास लेख-काला विशेष समाधान वाटेल.

हें चरित्र लिहिण्याच्या कामीं ज्या लेखांचा व ग्रंथांचा उपयोग झाला त्यांच्या कर्त्यांचा व मला मदत करणाऱ्या निरपेक्ष सुहृदांचा मी अत्यंत ऋणी आहे.

चित्रमयजगत् कार्यालय,
पुणें,
१-२-१९३२

रा. अ. कानिटकर

# रवींद्रनाथ टागोर

"अव्यक्त आत्मा, अंतर्ज्ञानज्योति व हृदयस्थ वृत्तींचें संवादपूर्ण ऐक्य यांचें जणूं काय व्यक्त व सचेतन प्रतीकच अशा दृष्टीनें रवींद्रनाथ टागोर हे आम्हांस आदर्शभूत झालेले आहेत. अत्यंत प्रक्षुब्ध अशा झंझावातांतही प्रशांतपणें आकाशविहार करणाऱ्या स्वतंत्र वृत्तीच्या विहंगमाप्रमाणें रवींद्रनाथ हे स्वैरविहारी कविखगेंद्र आहेत. प्रबल मनोविकारांचें दमन करून आपल्या हिरण्मय हृद्वीणेंतून अक्षय्यानंदाचे अमृतालाप काढण्यांत सदैव निमग्न असणाऱ्या जीवन्मुक्त योगीराजाच्या स्वरूपांत रवींद्रनाथ टागोर ह्या जगतीतलावर अवतीर्ण झाले आहेत असें आम्हांस वाटतें. असें असलें तरी, सामान्य जनतेच्या सांसारिक आपत्ति व परिताप यांविषयीं त्यांचा कलाविष्कार उदासीन अथवा संव्यथाशून्य राहिला नाहीं. ते एक प्रकारें विश्वाचे संरक्षक आहेत. आपल्या देशबांधवांच्या आणि एकंदर जगाच्या अत्यंत तीव्रतर विपत्प्रसंगीं प्रभावशाली त्राते व एकनिष्ठ रक्षक या नात्यांनीं आपलें कर्तव्य बजावण्यास ते सदैव सन्नद्ध आहेत. सारांश, आम्ही ह्या घटकेला जे कांहीं आहोंत व आमच्या हातून जी काय कार्यनिर्मिती होऊं शकली आहे त्या सर्वांचीं आदिमूलें व पल्लवविस्तार काव्य आणि प्रेम यांच्या पुण्यपावन गंगौघांत परिस्नात व सिंचित झालीं आहेत."

| | |
|---|---|
| जगदीशचंद्र बोस, | महात्मा गांधी. |
| अल्बर्ट ईन्स्टिन, | रोमेन रोलंड. |

# अनुक्रमणिका.

# भूमिका.



श्रीयुत रवींद्रनाथ टागोर यांची जी सर्वंध जगभर प्रसिद्धी झाली आहे ती, मुख्यतः नवभारताचे मंत्रद्रष्टे, भारतीय तत्त्वज्ञानाचे निष्ठावंत उपासक व विश्वैक्याचे एकांतिक पुरस्कर्ते या नात्यांनीं झालेली नाहीं. असामान्य प्रतिभाशालित्व व उत्कृष्ट काव्यकर्तृत्व या गुणांच्या सामर्थ्यावरच ते आज कीर्तिशिखरावर विराजमान झाले आहेत. ‘ **कवींद्र** ’ या एकाच नात्यानें त्यांनीं सर्व जगाचें अंतःकरण आपल्याकडे वेधून घेतलें आहे. कविवर्य ( The poet ) या आदरपूर्ण अभिधानानें त्यांचा सर्वत्र सत्कार केला जातो. कारण त्यांचें यशोरहस्य त्यांच्या काव्यशक्तींत एकवटलें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. आज जगांतील सर्व श्रेष्ठ कवींत त्यांची ‘ कविश्रेष्ठ ’ म्हणून गणना आहे. त्यांच्या तोडीचा कवि आज सबंध जगांत हयात नाहीं असें महात्मा गांधी म्हणतात. त्यांना ‘ कविकुलमुकुटमणि ’ असें निःसंशय म्हणतां येईल. ज्या नवनवो-

न्मेषशालिनी प्रातिभाशक्तीला वश करून घेऊन त्यांनीं 'गीतांजली'सारखें त्रिखंडविख्यात व जगन्मान्य असें काव्य लिहिलें, त्याच अदृश्यशक्तीनें त्यांना अभूतपूर्व यशाचाहि लाभ करून दिला. सत्कवि होण्याचें भाग्य स्पृहणीय व अभिमानास्पद नाहीं असें कोण म्हणूं शकेल ?

रवींद्रबाबू सत्कवि म्हणून जगापुढें आले, 'कवींद्र' म्हणून त्यांनीं त्रिखंडकीर्ति मिळविली, व 'काव्यदेवतेचें आशास्थान' म्हणून जगानें त्यांचा महनीय गौरव केला, या गोष्टी खऱ्या असल्या तरी त्यांचें श्रेष्ठत्व, त्यांचें व्यक्तित्व व त्यांचें यशोवैभव केवळ त्यांच्या काव्यगुणांत नाहीं. त्यांच्या काव्यापेक्षां त्यांचें तत्त्वज्ञान श्रेष्ठ दर्जाचें नसलें तरी महत्वाचें आहे व तें तत्त्वज्ञान जगापुढें मांडण्याकरितां त्यांचा अवतार झाला आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्यांचें जीवितध्येय फार व्यापक स्वरूपाचें आहे. 'भारतीय' म्हणवून घेण्यांत त्यांना अभिमान वाटत असला तरी त्यांची दृष्टी हिंदुस्थानापुरतीच संकुचित नाहीं. त्यांची दृष्टी विश्वै-क्यावर खिळलेली आहे. जगाच्या संस्कृतीचें एकीकरण करण्याच्या उद्देशानें त्यांनीं 'विश्वभारती' ही संस्था स्थापन केली आहे. दुसऱ्या राष्ट्रांत जें जें उत्कृष्ट, श्रेष्ठ व शाश्वतस्वरूपाचें असेल तें आत्मसात् करून आपल्या संस्कृतीचा दर्जा वाढविला पाहिजे असें त्यांचें मत आहे. जागतिक संस्कृतीच्या एकीकरणाची कल्पना करतांना रवींद्रबाबू राष्ट्रीयत्वाकडे अगदीं तुच्छतेच्या दृष्टीनें पहातात. हिंदुस्थानची जर कशानें हानि झाली असेल तर ती राष्ट्रीयत्वाच्या कल्पनेमुळें झाली आहे असें ते स्पष्टपणें उद्गार काढतात. राष्ट्रीयत्वाच्याच बेफाट कल्पनेमुळें एक राष्ट्र दुसऱ्या राष्ट्रास लुटण्यास उद्युक्त होतें. सध्यांचा राष्ट्रसंघ ही लुटारू राष्ट्रांची टोळी आहे असें त्यांचें मत आहे. ह्या राष्ट्रसंघामुळें जगांत शांतता नांदावयाला व युद्धें थांबवावयाला मुळींच मदत होत नाहीं. ह्या साध्या गोष्टी ज्या संघाला करतां येत नाहींत, उलट जो संघ दडपलेल्या राष्ट्रांना दडपलेल्या स्थितींतच ठेवूं पाहतो तो संघ अस्तित्वांतच नसलेला बरा असें त्यांना वाटतें. त्यांची 'विश्वभारती' ही अंतर्राष्ट्रीय संस्था विश्वशांतीचा व विश्वबंधुत्वाचा पुरस्कार करीत आहे.

राष्ट्रीयत्वावर जरी त्यांचा कटाक्ष असला तरी हिंदी राष्ट्राविषयीं त्यांच्या अंतःकरणांत पुरेपूर श्रद्धा व प्रेम वसत आहे. त्यांची स्वदेशभक्ति त्यांच्या काव्यांतून, त्यांच्या पोवाड्यांतून, त्यांच्या नाटकांतून व त्यांच्या कादंबऱ्यांतून आपणांस स्पष्ट दिसते. त्यांची दृष्टी खऱ्या स्वातंत्र्यावर खिळलेली असल्यामुळें व हिंदुस्थानाकरितां हिंदुस्थान एवढीच त्यांची भावना नसल्यामुळें त्यांच्या अंतःकरणांत स्वदेशप्रेम नाहीं अशीं जनतेची कल्पना झाली असल्यास नवल नाहीं. पण पंजाब प्रकरणाच्या निषेधार्थ त्यांनीं आपल्या 'सर' ह्या पदवीचा त्याग करून आणि सरकारच्या अत्याचारांचा वेळोवेळीं निषेध करून त्यांनीं आपली स्वतःची राष्ट्रीय मनोभावना प्रगट केलीच आहे. परवांच्या हिजली प्रकरणाबद्दल त्यांनीं काढलेले उद्गार असेच जळजळीत आहेत. हिंदुस्थानचें स्वातंत्र्य तर त्यांना अत्यंत प्रिय आहेच, पण त्यापेक्षां हिंदुस्थानाची संस्कृति सर्व जगांत सर्वश्रेष्ठ व्हावी अशी त्यांची अत्यंत तळमळीची व उत्कट मनीषा आहे. अज्ञान, भीरूत्व, स्वार्थांधता, लोलुपता, दांभिकपणा, खोट्या समजुती वगैरे बाह्य दुर्गुणांपासून हिंदुस्थान मुक्त झाला म्हणजे तो स्वातंत्र्य मिळविण्यास लायक झाला, किंबहुना स्वतंत्र झाला असें ते म्हणतात. म्हणून राष्ट्रप्रेमवर्धनापेक्षां संस्कृतिसंवर्धनाकडे ते अतिशय जिव्हाळ्यानें पहातात. राष्ट्राचें स्वातंत्र्य राहील किंवा जाईल, परंतु राष्ट्राची श्रेष्ठ संस्कृति शाश्वतस्वरूपाची आहे. व्यक्तीनें स्वार्थत्याग, ज्ञानप्राप्ति, आत्मशुद्धी व आत्मसंयमन या गुणांवर आत्मिक—अध्यात्मिक स्वातंत्र्य प्राप्त करून घेतलें पाहिजे. अध्यात्मपरता हें हिंदुस्थानच्या मनोभूमिकेचें वैशिष्ट्य असल्यामुळें हिंदुस्थानची दृष्टी कधींही स्वार्थपर व आत्मकेंद्रित झाली नव्हती. अधिक व्यापक दृष्टीनें जगदोद्धारार्थ प्रयत्न करावयाचा हें ब्रीद हिंदी साधुसंतांनीं व थोर सत्पुरुषांनीं अनेक वेळां बोलून दाखविलें आहे. हिंदुस्थानासाठीं हिंदुस्थानानें स्वतंत्र व सर्वश्रेष्ठ व्हावयाचें नाहीं, जगदोद्धारासाठीं हिंदुस्थानानें श्रेष्ठत्व संपादन करावयाचें आहे, असें श्रीअरविंद घोष यांच्याप्रमाणेंच रवींद्रबाबूंना मनापासून वाटत असतें.

# कवींद्र रवींद्रनाथ टागोर

स्वाभिमान, स्वावलंबन व आत्मोत्कर्ष या तेजस्वी गुणांचा संदेश त्यांच्या ग्रंथांच्या प्रत्येक पानांवर आपल्याला आढळून येईल. राष्ट्रीयत्वाविषयीं त्यांची जरी विश्वव्यापक वृत्ति असली तरी हिंदी राष्ट्रीयत्वाला ते पारखे झाले आहेत, किंवा हिंदुस्थानाविषयीं त्यांच्या अंतःकरणांत आत्मीययत्वाची वृत्ति नाहीं असें मुळींच नाहीं. त्यांचा देशाभिमान इतका प्रखर व उज्ज्वल आहे कीं तो त्यांच्या विश्वव्यापक राष्ट्रीयत्वाशीं विसंगत व प्रसंगीं विघातक आहे असेंही एकवेळ वाटल्याखेरीज रहात नाहीं. महात्मा गांधी हे विश्वशांतीच्या कल्पनेनें भारलेले असले तरी त्यांना रवींद्रनाथाइतका विश्वशांतीचा व विश्वप्रेमाचा पुरस्कर्ता कोणीही म्हणणार नाहीं. गांधीजी स्पष्टच म्हणतात कीं अंतर्राष्ट्रीयत्वापेक्षां मला आज राष्ट्रीयत्व हवें आहे. त्याच्या उलट टागोरांनीं स्वदेशभक्तीचे केवढेही पोवाडे गायिले तरी त्यांना गांधीजीइतके स्वदेशाभिमानी कोणीही समजणार नाहीं. टागोरांचें स्वदेशप्रेम एकादेवेळीं इतकें उतास जातें कीं विश्वबंधुत्वाचा आदर्श त्यांचा त्यांना सुद्धां सर्वतोपरी मान्य आहे कीं नाहीं अशी शंका वाटावयाला लागतें. त्यांच्या काव्यांत व वाङ्मयांत त्यांचें मातृभूमीबद्दलचें प्रेम इतकें उत्कट व जिव्हाळ्याचें दृष्टीस पडतें कीं तें खरोखरच अंतर्हृदयाच्या गाभाऱ्यांतून उद्भूत झालें असावें असें वाटूं लागतें. ‘ जळीं स्थळीं काष्ठीं, पाषाणीं ’ म्हणतात त्याप्रमाणें त्यांना देशाशिवाय दुसरें कांहीं दिसत नाहीं व दुसरें कांहीं सुचत नाहीं. त्यांच्याइतका उत्कट देशाभिमान फारच थोड्यांच्या अंगीं दिसत असेल ! ते म्हणतात “माझ्या मृत्यूनंतर माझा पुनर्जन्म हिंदुस्थानांतच होईल. दौर्बल्य, दारिद्र्य व दुर्गती यांनीं जरी हिंदुस्थान ग्रासलेला असला तरी हिंदुस्थान हेंच माझें प्रेमसर्वस्व राहील. ह्या देशांत माझा जन्म झाला याबद्दल मला अभिमान वाटतो. मातृभूमीवर प्रेम करण्यानेंच मी धन्य झालों व एवढ्या गौरवाला चढलों. ” रविबाबूंची राष्ट्रभक्ति व विश्वबंधुत्वाची भावना ह्या दोन्ही अलौकिक नाहींत असें कोण म्हणेल ?

‘ आधुनिक कालांतील अध्यात्माचा आदर्श गुरु ’ असें रविबाबूंना

यथार्थतेनें म्हणतां येईल. औपनिषदिक तत्त्वज्ञानच त्यांनीं स्फूर्तिदायक वाणीनें काव्यपूर्ण भाषेंत सांगितलें व तें तत्त्वज्ञान सामान्य जनसमूहाला आकलन होईल अशा रीतीनें सांगितलें. हेंच रवींद्रनाथ टागोरांचें जीवनकार्य होय यांत शंका नाहीं. त्यांचें तत्त्वज्ञान अमुक एका पंथाचें, अमुक एका धर्माचें आहे असें मुळींच नाहीं. हिंदुलोकांना, ब्राह्म पंथाच्या अनुयायांना किंवा बौद्धधर्मीयांना त्यांचें तत्त्वज्ञान आत्मीयत्वाचें वाटतें, त्याचप्रमाणें ख्रिस्ती लोकांनाही त्यांत आपलेपणा वाटतो. आधुनिक युगधर्माला परिचित असलेल्या व प्रचलित युगधर्माचा ज्याच्यावर परिणाम झाला आहे अशा व्यक्तीनें उपनिषदांवर एकादी बालबोधिनी टीका लिहावी अशा प्रकारचें त्यांचें तत्त्वज्ञान आहे. प्राचीन भारतवर्षाचा आत्मा त्यांत प्रतिबिंबित झालेला आहे. खऱ्या भारतीयाचें अंतःकरण त्यांत ओतलेलें आहे. ' रवींद्रांनीं पाश्चात्य तत्त्वज्ञानाची उसनवारी करून पुन्हां पाश्चात्यांनाच त्या तत्त्वज्ञानाचे पाठ देण्याचा उद्योग आरंभला आहे. ('स्पेक्टेटर' १४।२।१४) असे सामान्य व अनभिज्ञ माणसानें उद्गार काढल्यास नवल नाहीं. रवींद्रांच्या तत्त्वज्ञानांत विश्वबंधुत्वाची भावना प्रामुख्यानें ग्रथित झालेली असली तरी तें उपनिषदें व गीता यांवरच उभारलेलें आहे हें त्यांच्या ग्रंथांचा सूक्ष्म अभ्यास करणारांच्या ध्यानांत आल्यावांचून राहणार नाहीं. त्यांच्या तत्त्वज्ञानांत पौर्वात्य आणि पाश्चिमात्य संस्कृतींचा संगम दृष्टीस पडतो. पौर्वात्य अध्यात्मज्ञान आणि पाश्चात्य आधिभौतिक तत्त्वज्ञान यांचे प्रवाह त्यांच्या ग्रंथांत अगदीं एकरूप झालेसे वाटतात. रवींद्रबाबू प्राचीन हिंदी संस्कृतीचे कट्टे अभिमानी असले तरी पाश्चात्य राष्ट्रांत ज्या चांगल्या गोष्टी आहेत त्यांचा स्वीकार करावयाला त्यांची नेहेमींच तयारी असते. असें करतांना त्यांच्या मनांत नेहेमीं हा विचार घोळत असतो कीं एक राष्ट्र सदैवच सार्वभौम असूं शकणार नाहीं, आणि दुसरीं राष्ट्रें नेहेमींच पारतंत्र्यांत खितपत पडणार नाहींत. दास्यमग्न राष्ट्रांना ऊर्जितावस्था आहे असा त्यांचा दृढ विश्वास आहे. त्यांचा दैवावर, नियतिवादावर मुळींच भरंवसा नाहीं. एकादें राष्ट्र केवळ दुर्दैवामुळें गुलामगिरींत पडलें असें त्यांना कधींही वाटत नाहीं. प्रयत्न व

कार्यकर्तृत्व याच गोष्टी राष्ट्रोद्धाराच्या कामीं येतात असें त्यांना निश्चितपणें वाटतें.

टागोर हे राजकारणी पुरुष नसून शिक्षणप्रेमी व समाजसुधारक आहेत. समाजसुधारणा हेंच हिंदी राष्ट्राचें ध्येय आहे असें ते समजतात. ब्राह्मोपंथाचे ते अनुयायी असल्यामुळें त्यांनीं जातपात व कर्मकांडात्मक धर्म यांना तिलांजली दिली आहे. त्यांच्या घरांत आधुनिक सुधारणेनें आपलें साम्राज्य प्रस्थापित केलें आहे. हिंदुस्थानच्या उन्नतीच्या आड जर कोणती गोष्ट मुख्यतः येत असेल तर ती असंख्य जातिभेद ही होय. जनतेची जातिभेदाच्या तडाक्यांतून सुटका झाल्याशिवाय तिला चांगली स्थिति येणार नाहीं. जातिभेदाचें निर्मूलन हाच देशाच्या उत्कर्षाचा उपाय होय असें रविबाबूंचें स्पष्ट मत आहे. ग्रामसुधारणेकडेही रविबाबू आत्मीयत्वानें लक्ष पुरवितात. त्यांच्या शांतिनिकेतनांतील विद्यार्थ्यांना ग्रामसुधारणेचे प्रत्यक्ष पाठ देण्यासाठीं रविबाबू त्यांना नेहमीं ग्रामसंचारार्थ पाठवीत असतात. खेडेगांवांतील लोकांची सर्वांगीण उन्नति करण्याकडे प्रत्येक राष्ट्रभक्तानें अगत्य लक्ष द्यावें असें ते म्हणत असतात. खेडेगांवांतील जुन्या धंद्यांचें व हस्तकौशल्याचें पुनरुज्जीवन करण्याचा त्यांनीं पुष्कळच प्रयत्न केला आहे व तो बऱ्याच प्रमाणांत सिद्धीसही गेला आहे.

वयाला सत्तर वर्षें होऊन गेलीं तरी रवींद्रनाथ टागोर हे अद्यापही धडाडीचे उत्साहशाली व कार्यक्षम युवक आहेत असें प्रत्येकाला वाटल्यावांचून रहात नाहीं. त्यांचे विलक्षण तेजस्वी डोळे प्रेक्षकाला पहिल्याच दृष्टीपातांत आकर्षण करतात. छातीवर रुळणारी त्यांची पांढरी शुभ्र दाढी पहाणाऱ्याच्या मनांत आदरपूर्ण भावना उत्पन्न केल्याशिवाय रहात नाहीं. ते सौंदर्यद्रष्टे कविपुंगव असल्यामुळें त्यांचा परिवेष सौंदर्यपूर्ण असतोच, पण सौंदर्यापेक्षां त्यांत आकर्षकपणा अधिक असतो. त्यांची बोलण्याची पद्धत अशीच दुसऱ्यावर छाप बसविण्याजोगी आहे. आपण आपल्या श्रोत्यांपेक्षां श्रेष्ठ आहों, आपले श्रोते बुद्धीनें व ज्ञानानें अगदीं कनिष्ठ आहेत अशा अहंभावानें ते आपलें भाषण सुरूं करतात. प्रारंभीं अगदीं हळूं आवा-

जांत बोलूं लागतात, अशाकरितां कीं श्रोत्यांनीं त्यांच्याकडे लक्षपूर्वक अवधान द्यावें. हळूं हळूं ते आपला आवाज चढवितात आणि खालीं असलेली दृष्टी श्रोत्यांकडे वळवितात. त्यांच्या नजरेंत आणि वाणींत कोणत्या प्रकारची मोहिनी आहे न कळे ! कारण त्यांच्याशीं चार शब्द बोलण्याची ज्याला संधि मिळाली आहे तो त्यांचा अगदीं भक्त बनून जातो.

रवींद्रबाबूंच्या स्वागताच्या वेळीं प्रत्येक ठिकाणीं त्यांचें काव्य, त्यांचें तत्वज्ञान व त्यांची चित्रकला याविषयीं स्तुतिपर उद्गार काढले जातात. व त्याबद्दल ते तीव्र नापसंती व्यक्त करीत असतात. स्वतःबद्दल कोणी कांहीं बोलूं नये अशी इच्छा ते बाहेरून प्रदर्शित करीत असले तरी स्वतःचा अभूतपूर्व मानसन्मान व्हावा व आपणांवर स्तुतिसुमनांचा अखंड वर्षाव व्हावा असें त्यांच्या अंतर्मनाला वाटत असतें. त्यांच्या एकंदर व्यक्तिवैशिष्ट्याचें परीक्षण करूं जातां अपणांस कितीतरी विसंगत चमत्कार दिसूं लागतात. हे चमत्कार पाहिले म्हणजे सामान्य मनुष्य भांबावून गेल्याशिवाय रहाणार नाहीं. पण त्या गोष्टी पहाण्याची त्याला दृष्टी नसल्यामुळें टागोरांच्या महानुभावित्वावरची त्याची श्रद्धा अणुमात्रही चळण्याचें कारण नाहीं.

रवींद्रबाबू पूर्व आणि पश्चिम यांच्या एकीकरणाचे कट्टे पुरस्कर्ते आहेत. दोन्ही संस्कृतींचा संगम होण्याचें कार्य अशक्यप्राय आहे असें त्यांना वाटत नाहीं. म्हणून आपआपल्या परीनें स्वतंत्र व स्वयंपूर्ण असलेल्या संस्कृतीमध्यें तादात्म्य घडवून आणणें हें त्यांनीं आपलें जीवितध्येय ठरविलें आहे. ह्या दोन संस्कृती मुळांतच अभिन्न व परस्परसंबद्ध आहेत अशी रविबाबूंची विचारसरणी आहे. त्या एकमेकांना सहाय्यक होतील इतकेंच नव्हें तर एकमेकांना पूरकही होतील. त्यांचा मिलाफ घडवून आणण्याचें कार्य टागोरांना दुष्कर वाटत नाहीं. त्यांची मनोवृत्ति ऐक्यानुकूल व ऐक्योत्कंठित असल्यामुळें युरोपशीं व पाश्चात्य राष्ट्रांशीं आपला जितका संबंध येईल तितका यावा या हेतूनें ते युरोपकडे नेहेमीं जात येत असतात. आपल्या जीवनध्येयाचा जगाला परिचय व्हावा व तें

अमलांत यावें यासाठीं त्यांची नेहमीं खटपट चाललेली असते. हिंदुस्था-नांत राहून आपलें ध्येय साध्य व्हावयाचें नाहीं अशी त्यांची मनोभावना असली तरी आपलें कार्यक्षेत्र हिंदुस्थानच आहे ही गोष्ट त्यांनीं दृष्टीआड होऊं दिलेली नाहीं. जिनीव्हा येथें राष्ट्रसंघाचें मुख्य कार्यालय असल्यामुळें तेथें निरानिराळ्या देशांतले लोक नेहमीं येत जात असतात. अशा प्रकारच्या अंतर्राष्ट्रीय वातावरणांत कालक्षेप करणें रविबाबूंना मनापासून प्रिय आहे.

पौर्वात्य आणि पाश्चात्य संस्कृति यासंबंधानें बोलतांना ते एकदां म्हणाले, सामान्यतः कुठल्याही देशांत मनुष्य हा एकसारखाच आहे. पाश्चात्यांना वाटतें कीं आगगाड्या आणि मोटारी यामुळें आम्हीं श्रेष्ठ आहों. पौर्वात्यांच्या पुढें ह्या भौतिक सुधारणा घेऊन ते गर्वभरानें उद्गा-रतात कीं आमच्याइतके सुधारलेले लोक सबंध जगांत सांपडणार नाहींत. त्याच्या उलट आपल्या अध्यात्मिकतेची सर्व जगांत प्रौढी मिर-वून पौर्वात्य पाश्चात्यांपेक्षां स्वतःला श्रेष्ठ समजतात. पण पाश्चात्यांचें ध्येय यांत्रिक प्रगति व पौर्वात्यांचें अध्यात्मिक पूर्णावस्था असें मानणेंच मुळीं चुकीचें आहे. पाश्चात्य राष्ट्रांनीं यांत्रिककलेंत अपूर्व प्रगति केलेली असली तरी ते खरे सुधारलेले व संस्कृतिसंपन्न आहेत असें म्हणतां येत नाहीं. प्रगति ( Progress ) ही केंव्हांही आधिभौतिकच असणार व संस्कृति ( civilization ) अध्यात्मकच असावयाची असें त्यांचें ठाम मत आहे. ह्यासंबंधीं त्यांनीं सांगितलेली एक गोष्ट मोठी लक्षणीय आहे.

‘ एक लष्करी विमान एका खेड्यावर हल्ला करावयाला अगदीं सज्ज होऊन बसलें होतें. तें आतां त्या निरपराधी लोकांवर बॉंबगोळ्यांचा वर्षाव करून त्यांचा धुव्वा उडविणार, इतक्यांत एक यंत्र बिघडलें आणि त्या विमानाला त्या खेड्यांत उतरावें लागलें. कांहीं वेळांपूर्वीं ज्या लोकांना धुळीस मिळवावयाचा त्या विमानाचा बेत होता ते लोक त्या विमाना-भोंवतीं जमले. गर्दीतून स्त्रिया एकदम पुढें आल्या व त्यांनीं त्या वैमा-निकांना प्रथम एका सुरक्षित जागीं पोचविलें. कारण वरून आकाशांतून अद्यापिही बॉंबगोळ्यांचा वर्षाव होतच होता. विमान व बॉंबगोळे ही

प्रगति, पण त्या स्त्रिया मात्र खऱ्या संस्कृतीच्या पुरस्कर्त्या असें आपणांला निःसंशय म्हणतां येणार नाहीं काय ! '

प्रगतीच्या दृष्टीनें पाश्चात्य पौर्वात्यावर आपला अंमल चालवीत आहेत व संस्कृतीच्या दृष्टीनें पौर्वात्य सर्व जगावर आपलें प्रभुत्व गाजवीत आहेत असें म्हटलें तर तें रविबाबूंना पटावयाचें नाहीं. ते म्हणतील कीं पौर्वात्यांचें पाश्चिमात्यावर कधींही कायमचें वजन पडणार नाहीं. कारण पाश्चिमात्यांचें वैशिष्ट्य त्यांच्या आधिभौतिकतेंत नसून त्यांच्या चांचल्यांत-अस्थिरतेंत आहे. फॅशनचे प्रकार पाहिल्यास हें ध्यानांत येईल. ही अस्थिरता पोशाखांतच आहे असें नाहीं तर ती विचारांत व व्यक्तिसंबंधांतही आहे. क्षणोक्षणीं नवीन गोष्टींचा हव्यास धरणें हें पाश्चिमात्यांचें एक वैशिष्ट्यच आहे. म्हणून पौर्वात्य संस्कृतीचा पाश्चात्यावर कायम टिकेल असा प्रभाव पडणार नाहीं. ज्या राष्ट्रांत उच्च संस्कृती आहे त्या राष्ट्रांत यांत्रिक सुधारणांचें साम्राज्य झालें तरी त्याचा त्या संस्कृतीला मुळींच धक्का बसणार नाहीं. उलट त्या संस्कृतीचा फायदाच होईल. यांत्रिक सुधारणा जर संस्कृतीवर घाला घालण्यास सिद्ध होतील तर जगावर मोटीच आपत्ति ओढवेल. पण जी खरी संस्कृती आहे ती असल्या बाह्य आक्रमणामुळें यत्किंचितही हलली जाणार नाहीं.ती आपल्या स्वयंभू तेजाच्या सामर्थ्यावर त्या सुधारणेलाच आपली दासी केल्याशिवाय राहणार नाहीं, असें रविबाबू निक्षून सांगतात.

प्राचीन श्रेष्ठ संस्कृतीचें पुनरुज्जीवन व प्रचलित पाश्चात्य संस्कृतीचें संवर्धन या तत्त्वांवर रवींद्रनाथ टागोरांनीं आपल्या 'शांतिनिकेतना'ची संस्थापना केली आहे. हल्लींची शिक्षणपद्धति संस्कृतीला प्राधान्य देत नसल्यामुळें सदोष आहे अशा विचारानें व मनुष्याचें जीवन 'संपूर्ण' करण्याच्या उद्देशानें त्यांनीं हें विश्वविद्यालय निर्माण कलें आहे. पुस्तकी शिक्षणाबरोबरच कला, संस्कृती, सौंदर्यदृष्टी, व्यवहार, शील इत्यादिकांचेंही संपूर्ण शिक्षण तेथें दिलें जातें. शिक्षणांत सौंदर्यसमीक्षेची दृष्टी प्रामुख्यानें ठेविली जाते. शांतिनिकेतनांत पाऊल ठेवल्यावर आपण एकाद्या प्राचीन ऋषीच्या आश्रमांत तर आलों नाहीं ना असें वाटूं लागतें. तेथील निसर्गरम्य,

आल्हाददायक व पवित्र वातावरण तपोवनाची आठवण करून देतें. वृक्षाच्या शीतल छायेखालीं गुरुजन व शिष्यगण आपापल्या कार्यांत एकतानता पावले आहेत, हें दृश्य प्राचीन गुरुकुलाचें चित्र डोळ्यांपुढें उभें करीत नाहीं काय ? ह्या शांतिनिकेतनांत जगांतील सर्व धर्म, सर्व भाषा, सर्व विद्या व कला, सर्व संस्कृती व सर्व राष्ट्रांतील विद्यार्थी एकवटले आहेत. पाश्चात्य देशांतील विद्वानांना बोलावून त्यांची खास व्याख्यानें करण्यांत येतात. तेथें सर्व प्रकारचें आधुनिक शिक्षण दिलें जातेंच, त्याशिवाय चित्रकला, कृषिकर्म, ग्रामसंघटना, आरोग्यशास्त्र, मूर्तिकला, संगीत इत्यादि विविध व उपयुक्त विषय शिकविले जातात. विद्यार्थी व विद्यार्थिनी यांना एकत्र शिक्षण देण्यांत येतें. विद्यार्थ्यांच्या अंतःकरणांत वर्ण, कुल, जात, पोटजात असल्या क्षुद्र व आकुंचित भावना राहूं नयेत, त्यांची दृष्टी व्यापक व सर्वंकष व्हावी, अशा प्रकाराचें तेथें शिक्षण दिलें जातें. विश्वबंधुत्वाचा व विश्वप्रेमाचा आदर्श विद्यार्थ्यांपुढें सदासर्वकाळ असतो, हें काय सांगावयास पाहिजे ?

रवींद्रनाथ टागोर हें ' **कलाभारती** ' आहेत असें म्हटल्यास हरकत नाहीं. विद्या व कला यांत त्यांनीं अपूर्व नैपुण्य संपादन केलें आहे, काव्याबद्दल बोलावयालाच नको. ते मूर्तिमंत काव्यावतारच आहेत. नोबेल पारितोषिक ज्याच्या वांट्याला आलें त्याची काव्यशक्ति केवढ्या श्रेष्ठतेची असेल हें सांगावयास पाहिजे असें नाहीं. संगीत, नर्तन, नाट्य, अभिनय, व चित्रकला या ललितकला त्यांच्या बाबतींत जणों सहजसिद्धच आहेत, असें एकाद्याला वाटल्यास नवल नाहीं. स्वतःच्या कविता ते इतक्या तादात्म्यानें व मोहक आवाजांत म्हणून दाखवितात कीं श्रोत्यांनीं देहभानच विसरून जावें. स्वतःच्या नाटकांत व कधींकधीं चित्रपटांतही त्यांनीं हौसेखातर काम केलें आहे, व तें अत्यंत यशस्वीही झालें आहे. रवींद्रनाथ अलीकडे चित्रकार बनले आहेत, व मूर्तिकार बनण्याचाही त्यांचा विचार चालू आहे. त्यांनीं चित्रकलेचा मुळींच अभ्यास केलेला नाहीं तरी त्यांचीं चित्रें उत्कृष्ट ठरलीं आहेत. जर्मनी, इंग्लंड, इत्यादि पाश्चात्य राष्ट्रांतील सुप्रसिद्ध म्युझियम्सनीं त्यांच्या चित्रांचा अभिमानपूर्वक संग्रह करून ठेवला

आहे. ज्या कल्पनारम्य गोष्टी ते आजपर्यंत काव्यरूपानें ग्रथित करून जगापुढें मांडीत होते; तें काव्यपूर्ण तत्त्वज्ञान रविबाबू आतां चित्रांच्या द्वारें मानवजातीच्या स्वाधीन करून ठेवीत आहेत. त्यांचीं चित्रें गूढार्थबोधक व प्रतीकात्मक असतात.

रवींद्रनाथांचें तत्त्वज्ञान 'सौंदर्यसमीक्षक अध्यात्मवाद' (Aesthetic Spiritualism) या दोन शब्दांत सांगतां येईल. टागोरांचा अध्यात्मवाद सामान्य जनतेच्या आटोक्यांत येण्यासारखा आहे व सर्वसाधारण बुद्धीच्या लोकांना आकलन होण्यासारखा आहे. ज्यांचा बुद्धिवादावर दृढ विश्वास आहे किंवा जे बुद्धिप्रामाण्यवादी आहेत त्यांना हा टागोरांचा सौंदर्यदृष्टीचा अध्यात्मिक धर्म पसंत पडेल यांत शंका नाहीं.

रवींद्रबाबूंचें तत्त्वज्ञान निदान महाराष्ट्राला तरी अपरिचित व नवीन नाहीं. महाराष्ट्रीय साधुसंतांनीं व सत्कवींनीं विश्वप्रेमाचा व विश्वबंधुत्वाचा उच्चैर्घोष केला असल्यामुळें 'जगाच्या अध्यात्मिक ऐक्या'वरचें त्यांचें 'पर्वतावरील प्रवचन' महाराष्ट्राला आकर्षित करूं शकलें नाहीं. रवींद्रबाबूंनीं आपल्या ग्रंथांना इंग्रजी पेहेराव चढविल्यामुळें त्यांची पाश्चात्य राष्ट्रांत 'कविवर्य' म्हणून ख्याती झाली. आधिभौतिकवादी व भोगप्रवण पाश्चात्यांना रवींद्रांचें तत्त्वज्ञान नवीन व अपूर्व वाटल्यास नवल नाहीं. म्हणूनच रविबाबू नोबेल पारितोषिकाचे अधिकारी ठरले. रवींद्रांचा कीर्तिसुगंध बंगालमधून हिंदुस्थानाकडे आला नाहीं; हा सुगंध सर्व जगांत दरवळून सोडण्याचें श्रेय पश्चिमवायूनें घेतलें. महाराष्ट्रांतील एकेका साधुकवीची कृती इंग्रजी भाषांतररूपानें जगापुढें येईल तर ती नोबेल पारितोषिकाला निःसंशय लायक ठरल्यावांचून रहाणार नाहीं. महाराष्ट्राला अशा किती तरी नोबेल पारितोषकांचा लाभ झाला असता. पण दुर्दैवाची व खेदाची गोष्ट ही कीं ते कवि आज हयात नाहींत. अशा परिस्थितींत अध्यात्मपरता हें महाराष्ट्राचें किंबहुना हिंदुस्थानाचें वैशिष्ठ्य असल्यामुळें रवींद्रबाबूंची मधुर काव्यवाणी हिंदी जनतेस मोह पाडण्यास समर्थ झाली नाहीं. रवींद्रांच्या 'गीतांजली'तील भक्तिभाव, अध्यात्मवाद, परमेश्वराविषयींची सख्यतेची भावना, अनिर्वचनीय जिव्हाळा,

अद्वैत, लीनता वगैरे गोष्टी महाराष्ट्रीय महानुभाव संतकवींचें वाङ्मय वाचणाराला कांहीं नवीन नाहींत. ' रवींद्रनाथ हे अध्यात्मवादी कवि आहेत व अध्यात्मवाद तर महाराष्ट्रीयांच्या रोमरोमीं भरला आहे; तेव्हां रवींद्रांच्या 'शिशु'सारख्या स्वभावचित्राचें महाराष्ट्रास जितकें कौतुक वाटतें, तितकें त्यांच्या गीतांजलीसारख्या अध्यात्मपर काव्यानें वाटत नाहीं. ' हें म्हणणें जरी खरें धरलें तरी ' रवींद्रांनीं तो शिळा वेदान्तच आपल्या ओजस्वी वाणीनें नव्या स्फूर्तीनें गायिला असल्यामुळें त्यास नवीनपणा व जिवंतपणा आला आहे ' ही गोष्टही नाकबूल करतां येण्यासारखी नाहीं. आधुनिक सुशिक्षितांना व बुद्धिप्रामाण्यवाद्यांना हा ग्रंथ नवीन दृष्टी दिल्यावांचून रहाणार नाहीं.

रवींद्रनाथ प्रारंभीं राष्ट्रीयत्वाचे कट्टे पुरस्कर्ते होते. हिंदुस्थानावांचून आपला दुसरा देश नाहीं व हिंदुस्थानावांचून आपलें दुसरें कार्यक्षेत्र नाहीं, अशी रविबाबूंनीं आपली खूणगांठ बांधून ठेवली होती. पाश्चात्यविद्येच्या अंमलामुळें ते ' देशाभिमान ' हाच जगांतील सर्वोत्कृष्ट सद्गुण समजूं लागले. त्यांच्या अंगांत इतका प्रखर देशाभिमान संचारला होता कीं देशासाठीं आत्मबलिदान करण्यासही त्यांनीं मागेंपुढें पाहिलें नसतें, असें एकाद्याला वाटल्यास नवल नाहीं. पण नोकरशाहीचीं कुकृत्यें, क्रांतिकारकांचे अत्याचार व राष्ट्रीय पुढाऱ्यांची समाजसुधारणे विषयींची अनास्था पाहून त्यांना राजकारणाबद्दल अप्रीति उत्पन्न झाली आणि राजकारण हें आपलें कार्यक्षेत्र नव्हे असा निश्चय करून ते राजकारणापासून परावृत्त झाले. शांतिनिकेतन व विश्वभारती यांच्या जन्मापूर्वीच ते विश्वबंधुत्वाचे पुरस्कर्ते बनले व राष्ट्रीयत्व ही महान् आपत्ति आहे असें प्रतिपादूं लागले. टागोरांच्या म्हणण्याप्रमाणें राष्ट्रीयत्व ही संकुचित विचारसरणी आहे ही गोष्ट ही मान्य करण्यास हरकत नाहीं. पण केव्हां ? राष्ट्र स्वतंत्र झाल्यावर. राष्ट्र स्वतंत्र होण्यापूर्वी, संबंध राष्ट्रांत बंधुभाव निर्माण होण्यापूर्वी, राष्ट्रांत ऐक्यभाव स्थापन होण्यापूर्वी अंतर्राष्ट्रीयत्वाची व विश्वबंधुत्वाची भाषा बोलणें अप्रयोजकपणाचें आहे, राष्ट्र सर्व बाजूंनें दृढ

होऊन आपल्या पायावर खंबीरपणानें उभारावयास समर्थ झालें, त्यानें आपली अध्यात्मिक, आधिभौतिक, आर्थिक, सांस्कृतिक व सामाजिक उन्नति करून घेतली तरच त्या राष्ट्राला विश्वैक्याबद्दल आणि विश्वशांतीबद्दल बोलावयाला अधिकार येईल. इतर परतंत्र राष्ट्रांना विश्वैक्याबद्दल बोलावयाला अधिकारच नाहीं. अंतराष्ट्रीयत्वाच्या आधीं संपूर्ण राष्ट्रीयत्व स्थापन झालें पाहिजे. जगांतील बंधमग्न राष्ट्रें दास्यमुक्त झाल्याशिवाय विश्वबंधुत्वाची व अंतर्राष्ट्रीयत्वाची भावना सध्यांच्या राष्ट्राच्या परिस्थितींत अप्रयोजक व असमंजसपणाची वाटल्यावांचून रहाणार नाहीं.

टागोरांचें भावी हिंदुस्थानचें कल्पनारम्य दृश्य पुढीलप्रमाणें आहे:—

Where the mind is without fear and the head is held high,
Where knowledge is free,
Where the world has not been broken up by narrow domestic walls,
Where words come out from the depth of truth.
Where the clear stream of reason has not lost its way in the dreary desert sand of dead habit,
Where the mind is led forward by thee into everwidening thought and action,
Into that heaven of freedom, my Father, let my country awake ! "

# प्रकरण पहिलें

## बंगालच्या पुनरुज्जीवनाचा उषःकाल

निरभ्र आकाशांत लुकलुकणाऱ्या तारकांनीं पदार्पण करून आपल्या तेजानें आकाशाच्या निळ्या रंगाला अधिकच नयनरम्य करून टाकावें, चंद्रकमलांनीं प्रफुल्लित होण्यासाठीं केव्हांपासून सिद्ध होऊन रहावें, रजनीकुसुमानें आपला मनोहर सुगंध दाही दिशास दरवळून सोडावा, प्रशांत यामिनीचा मनोभंग होऊं नये म्हणून कोकिलादि खगांनीं आपलें कुहूकूजित थांबवावें, चकोरानें अमृतपान करण्याकरितां आपली चोंच वर करून तासचे तास उत्कंठित होऊन रहावें, अशा प्रकारची सर्व सिद्धता झाल्यावर ' मूर्तिमंत आल्हाद ' अशा चंद्रानें मंदगतीनें नभःपटावर प्रवेश करावा,—त्याचप्रमाणें पौर्वात्य व पाश्चात्य संस्कृतींच्या संगमाला सुरवात होऊन बंगालच्या पुनरुज्जीवनाची सर्वप्रकारें पूर्वतयारी झाल्यावर रवींद्रनाथ टागोर ह्या जगतीतलावर अवतीर्ण झाले. एकोणिसाव्या शतकाची सुरवात म्हणजे बंगालच्या जागृतीचा प्रभातकाल ! मुसलमानांनीं आपलें साम्राज्य गाजवून इस्लामी संस्कृती चिरस्थायी करण्यासाठीं केलेले अट्टाहासाचे प्रयत्न एकोणिसाव्या शतकानें निष्फल केले. मात्र मुसलमानांच्या राजवटींतच बंगाली वाङ्मयाचा उदय झाला. बंगालला जें आजचें स्वरूप प्राप्त झालें आहे त्याचें बरेंचसें श्रेय राजा राममोहन रॉय, राजा द्वारकानाथ टागोर, महर्षि देवेंद्रनाथ टागोर, केशवचंद्र सेन, ईश्वरचंद्र विद्यासागर, मधुसूदन दत्त, रामकृष्ण परमहंस, बंकीमचंद्र चतर्जी, इत्यादिकांना दिलें पाहिजे. टागोर-कुटुंब धीमान्, श्रीमान्, कुलवान् व कीर्तिमान् असल्यामुळें त्याला बंगालच्या पुनरुज्जीवनाचे धक्के बसल्यावांचून राहिले नाहींत, व धक्के बसले म्हणूनच टागोर कुटुंबांत रवींद्रनाथासारखा जागतिक संस्कृतीचा आदर्श जन्माला आला. बंगालमध्यें चाललेली धार्मिक, अध्यात्मिक, वाङ्मयिक, राष्ट्रीय व राजकीय आंदोलनें सर्वंकष असल्यामुळें त्यांचा प्रमुख बंगाली कुटुंबावर विशेष दूरवर परिणाम झाला असल्यास नवल नाहीं. रवींद्रबाबूंच्या

जन्माच्या वेळीं नवीन संस्कृती ग्रहण करावयाला व जगाला स्वतःचा संदेश द्यावयाला बंगाल अगदीं सिद्ध होऊन राहिला होता. ब्राह्मसमाजानें नवधर्माची घोषणा करून बंगालला जागृत केलें होतें, स्वतंत्र व तेजस्वी बंगाली वाङ्मयानें आपले विद्युत्कण पसरण्यास सुरवात केली होती, आंग्लवाङ्मयानें व ख्रिस्ती धर्मानें आपले मोहपाश सज्ज केले होते व हिंदी संस्कृतीचें पुनरुज्जीवन करण्यासाठीं विद्वान् राष्ट्रहितैषी सिद्ध झाले होते. अशी अत्यंत अनुकूल परिस्थिति लाभणें ही अत्यंत भाग्याची गोष्ट होती. रवींद्रनाथांना हें भाग्य लाभल्यामुळें त्यांच्या कर्तृत्वशक्तीला योग्य तो अवसर मिळाला.

## टागोर घराणें.

टागोरांचें घराणें जरी श्रेष्ठ, कुलीन, विद्याधनसंपन्न व विख्यात होतें तरी जुना सनातनी ब्राह्मणसमाज त्याला कनिष्ट व हलक्या जातीचेंच समजत असे. टागोरांना ' पिरिली ' ब्राह्मण म्हणतात. टागोर घराण्यांतील पुरुषांनीं कांहीं वर्षांपूर्वीं मुसलमानी राजवटींत दिवाणगिरीचें काम केल्यामुळें त्यांना हें नांव मिळालें होतें. [ पिरिली=पीर+अली=मुख्य प्रधान--असा मूळ पार्शियन अर्थ आहे. ] मुसलमानांचे दिवाण मुसलमानांबरोबर साहाजिकच खानपानादि व्यवहार करीत असले पाहिजेत अशा समजुतीनें समाजानें त्यांना वाळींत टाकलें. टागोर बहिष्कृत ठरल्यामुळें त्यांच्याशीं कोणीही कर्मठ व सनातनी ब्राह्मण कोणत्याही प्रकारचा व्यवहार करीत नसत. मग रोटीबेटीव्यवहाराची गोष्ट तर दूरच. टागोर जरी मोठे जमीनदार व सुधारणेचे पुरस्कर्ते होते तरी ज्यांना त्यांना हिणवावयाचें असेल ते टागोरांना ' पिरिली ' म्हणून स्वतःची इच्छा पुरवून घेत. पण खरोखर पाहिलें असतां टागोर हे मूळचे भट्टाचार्य ( बानर्जी ) होत. भट्टाचार्य हे सर्व समाजांत श्रेष्ठ समजले जातात. टागोर घराण्याला इंग्रजांच्या राजवटींत 'ठाकूर' ( अधिपति ) नांव मिळालें. टागोर हा ठाकूरचाच अपभ्रंश आहे. समाजानें बहिष्कृत केलेलें टागोरांचें घराणें देशाला ललामभूत व्हावें, ही गोष्ट अलौकिक कर्तबगारीखेरीज शक्य झाली असेल काय ?

# कवींद्र रवींद्रनाथ टागोर

**द्वारकानाथ टागोर** हे रवींद्रनाथांचे आजोबा. राममोहनरायाप्रमाणें ते विलायतेला जाऊन आले होते. तेथें त्यांचें विशेष थाटानें व गौरवानें स्वागत होऊन ' राजा द्वारकानाथ टागोर ' या नांवानें ते तेथें प्रसिद्धीस आले. अत्यंत श्रीमान व धनंतर अशी त्यांनीं कीर्ति मिळविली खरी, पण त्याचबरोबर आपल्या उधळ्या स्वभावामुळें त्यांनीं पाठीमागें प्रचंड ऋणाचें ओझें आपल्या मुलांसाठीं ठेवून दिलें. त्यांचे सुविख्यात पुत्र महर्षि **देवेंद्रनाथ टागोर** यांनीं हें सर्व कर्ज फेडलें व अतिशय संपत्तिमान म्हणून त्यांनीं हीं नांव मिळविलें. देवेंद्रनाथ यांचें उदात्त आणि उज्ज्वल चारित्र्य, त्यांची तपस्या व त्यांचें निर्भय सत्याचरण या गुणांमुळें जनतेनें त्यांना ' महर्षि ' ही पदवी अर्पण केली. ब्राह्मसमाज राममोहनराय यांनीं स्थापन केला खरा पण त्याचा पाया बळकट करून त्याची शाश्वत प्राण-प्रतिष्ठा करण्याचें सर्व श्रेय महर्षींनाच दिलें पाहिजे. देवेंद्रनाथ मूर्तिपूजेचे कट्टे विरोधक असून मूर्तिपूजेचा पंथ नामशेष करण्यासाठीं त्यांनीं अटो-काट प्रयत्न केले. त्यांनीं लिहिलेलें आत्मचरित्र मनोरंजक असून त्यांतलि अध्यात्मिक चर्चा अतिशय मौल्यवान आहे. त्यांच्याबरोबर कांहीं दिवस केशवचंद्र सेन यांनीं कार्य केलें. १८६६ मध्यें त्यांनीं आपली जीवित-यात्रा संपविली.

रवींद्रनाथांचें घर म्हणजे लक्ष्मीसरस्वतींचें माहेरघरच होय. लक्ष्मीचा जसा त्यांच्या घराण्यावर अखंड वरदहस्त होता, त्याप्रमाणेंच सरस्वतीनेंही आपली कृपादृष्टी त्यावर ठेवून त्याला पावन केलें होतें.' टागोरांचें घराणें अखिल बंगाल्यांत धनंतर म्हणून सुप्रसिद्ध होतेंच. त्यांत राजा द्वारकानाथ व महर्षि देवेंद्रनाथ यांनीं ब्राह्मसमाजाच्या संस्थापनेंत महत्वाचा भाग घेतल्यामुळें त्यांचीं नांवें बंगाल्यांत सुविख्यात झालीं होतीं. बुद्धिमत्ता आणि संपत्ती, यशोवैभव आणि द्रव्यसमृद्धी—कीर्ति आणि श्री यांच्या अखंडनिवासामुळें टागोरांचें घराणें मशहूर झालें होतें. रवींद्रांचे ज्येष्ठ बंधू द्विजेंद्रनाथ हे उत्तम बंगाली लेखक असून तत्वज्ञानी आहेत. दुसरे बंधू ज्योतिरिंद्र हे उत्कृष्ट चित्रकार असून त्यांची चित्रकला अनेक कला-कोविदांनीं मुक्तकंठानें वाखाणली आहे. त्यांचा तिसरा भाऊ ' सिव्हिल

सर्व्हिसची परीक्षा पास झालेला पहिला हिंदी गृहस्थ ' म्हणून प्रसिद्ध आहे. रवींद्रांचे दोन पुतणे अवनींद्रनाथ व गगनेंद्रनाथ हे उत्कृष्ट चित्रकार व हिंदी चित्रकलेचे निःसीम उपासक म्हणून हिंदुस्थानांत सुविख्यात आहेत. अवनींद्रनाथ एका चित्रकला विद्यालयाचे प्रमुख अध्यापक असून त्यांच्या शिक्षणाचा लाभ घेण्याकरितां हिंदुस्थानांतून व परदेशांतूनही विद्यार्थी येत असतात. कांहीं दिवस ते सरकारी आर्टस्कूलचे प्रिन्सिपॉल होते. गगनेंद्रनाथही वरच्या दर्जाचे चितारी आहेत. टागोरांच्या कुटुंबांत संगीत कलेचाही प्रवेश नाहीं, असें नाहीं. त्यांच्या घरांत सर्वकलांचा समुच्चय असल्यामुळें त्यांच्या घराला ' कलामंदिर ' म्हणणें समुचित ठरेल. अशा कलापूर्ण वातावरणांत रवींद्रांचें बालपण गेलें.

## बाल्यावस्था

रवींद्राचा जन्म ६ मे १८६१ रोजीं झाला. त्यांच्या जन्मानंतर महर्षि देवेंद्रनाथ टागोर यांनीं जवळजवळ संन्यासाश्रम धारण केला. प्रत्यक्ष गृहत्याग केला नाहीं इतकेंच. बाकी ते आपला बहुतेक काळ अध्यात्मचिंतनांत घालवूं लागले. त्यांचे कोणाशीं बोलणें चालणेंही बंद झाल्यासारखेंच होतें. लहानपणींच रवींद्र मातृहीन झाल्यामुळें त्यांच्या पालनपोषणाची सर्व जबाबदारी नोकरचाकरांवर पडली. तरी त्यांची फारशी आबाळ झाली नाहीं. घरीं शिकवावयाला मास्तर ठेविले होते पण रवींद्र त्यांना शक्य तितकें चुकवीत. त्यांना शाळेंत घालण्यांत आलें तरी शाळेंतून सूंबाल्या करण्यांत त्यांचा पहिला नंबर असे. त्यांचें सर्व आयुष्य याप्रमाणें रुळलेल्या मार्गाचा तिरस्कार करण्यांत गेलें आहे. धक्काबुक्की करून जगाचे धक्केचपेटे सोसून अनुभव मिळविण्याची जी कित्येकांची मनोवृत्ती असते, त्या मनोवृत्तीला ते पारखे असल्यामुळें जगाचा अनुभव मिळण्यास रवींद्रांना बराच त्रास सोसावा लागला. त्यांना जें शिक्षण मिळालें तें शाळेंतून किंवा घरीं ठेवलेल्या शिक्षकांपासून मिळालें नाहीं. आजूबाजूची परिस्थिति व आपला जीवितक्रम यापासून त्यांनीं बरेंच शिक्षण संपादन केलें. रवींद्रांचें घर म्हणजे एक भव्य प्रासादच

आहे. अनेक चौक, अनेक खोल्या, उंच मनोरे, आजूबाजूला उपवन अशा अनेक गोष्टींनीं तो भूषविला आहे. उंच मनोऱ्यावर उभें राहिलें असतां सबंध कलकत्ता शहर दृष्टिपथांत येतें. लहानपणीं गच्ची-वरील कठड्याला टेकून तासच्या तास उभी रहाणारी व समोरच्या गरीब व निराश्रित लोकांच्या झोंपड्याकडे सहृदयांतःकरणानें टक लावणारी रवींद्रांची मूर्ति अजूनही पुष्कळांच्या आठवणींत असेल. त्यांच्या अशा विलक्षण व एकांतप्रिय वृत्तिमुळेंच त्यांना एवढी विद्वत्ता संपादन करतां आली व ते विश्वविख्यात जगत्कवि झाले असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. घराबाहेरच्या मोकळ्या वातावरणांत न जातां त्यांनीं केवळ निरी-क्षणानें इतकें ज्ञान मिळविलें. त्यांची काव्यशक्ती अगदीं लहानपणींच जागृत झाली त्याचें कारण तरी हेंच. त्यांची निसर्गनिरत व एकांतप्रेमी वृत्ती काव्यानिर्मितीला कारणीभूत झाली यांत संदेह नाहीं. राजकारण ही एक भयंकर व क्रांतिकारक गोष्ट आहे असा विचार करून राज-कारणाचा अभ्यास करण्याकरितां कलकत्त्यांत कांहीं मुलांनीं कांहीं गुप्त समित्या स्थापन केल्या होत्या, रवींद्रनाथ ह्या समितीचे सभासदही झाले होते. नाट्य आणि संगीत या गोष्टींनीं तर त्यांना वेड लावलें होतें.

रवींद्रांचे बाळपणचे अनुभव तर कांहीं अपूर्वच आहेत. त्यांच्या आत्मचरित्रांतलि कांहीं उतारे येथें मुद्दाम दिले आहेत. त्यावरून त्यांची ओळख होण्यास मदत होईल:—

## कवि आणि चोर

" त्यावेळीं माझें वय आठ वर्षांहून खात्रीनें अधिक नव्हतें. माझें वय थोडें होतें तरी मी कविता बऱ्या लिही व अशीच ज्योतीची समजूत झालेली होती.—ज्योति हा माझ्या वडिलांच्या पुतणीचा मुलगा होता.— वास्तवीक अशी समजूत होण्याला कांहींच कारण घडून आलेलें नव्हतें. एके दिवशीं दुपारीं त्यानें मला आपल्या खोलींत बोलावून एक कविता रचावयास सांगितली; आणि चौदा अक्षरांच्या पायर वृत्ताची रचनाही त्यानें मला समजावून दिली.

" त्या दिवसापर्यंत छापील पुस्तकाशिवाय मी दुसरीकडे कोठें कविता पाहिलेल्या नव्हत्या. छापील पुस्तकांतील कवितांत लिहिण्याची चुकी नाहीं; खोडाखोड नाहीं; कांहीं नाहीं. कितीही प्रयत्न केला तरी अशा-प्रकारचें कवित्व मला करतां येईल अशी नुसती कल्पना करण्याचें देखील धारिष्ट मला झालें नसतें. एके दिवशीं आमच्या घरीं एक चोर पकडलेला होता. चोर म्हणजे असतो तरी कसा हें पहाण्याच्या जिज्ञासेनें मला पछाडल्यामुळें भीतीनें कांपतकांपतच त्याला पहाण्यासाठीं मी त्या जागीं जाण्याचें धारिष्ट केलें. तेथें जाऊन पहातों तों एक अगदीं साधा माणसा-सारखाच माणूस ! त्याच्यांत व इतर माणसांत मला कांहींच फरक दिसला नाहीं. त्यामुळें दरवाजावरील पहारेकऱ्यानें त्याला वाईट रीतीनें वागवितांना पाहून मला त्याची फार कींव आली. काव्यरचनेसंबंधींही मला तसलाच अनुभव आला. प्रथम मला या गोष्टीचा मोठा बाऊ वाटत होता; पण ज्योतीनें मला कविता करावयाला सांगितल्यावर माझ्या इच्छेनुरूप मी कांहीं शब्द एके ठिकाणीं जुळविले; आणि पहातों तों पायरवृत्त तयार झालेलें ! ज्योतीनें मला समजावून दिलेलेंच पायर-वृत्त ! तेव्हां मात्र काव्यरचनेंतील यशासंबंधानें मला कांहींच शंका राहिली नाहीं ! पहारेकऱ्यानें चोराला वाईट रीतीनें वागविल्याबद्दल जसें मला वाईट वाटलें होतें तसेंच अयोग्य लोकांकडून काव्यदेवतेच्या होणाऱ्या विटंबनेबद्दल आतां देखील मला फार खेद वाटतो ! काव्य-देवतेबद्दल मान कैकवेळां अनुकंपा वाटली असेल, पण करणार काय ? हल्ला चढविण्यास अधीर झालेले हात खेंचून धरण्याचें सामर्थ्य माझ्या-मध्यें कोठलें असणार ? काव्यदेवतेस आजपर्यंत जितके कष्ट सोसावे लागले असतील, जितक्या हातांनीं तिला कुरूप केली असेल, तितके कष्ट चोराला खास सोसावे लागले नसतील आणि तितक्या हातांचा त्याला स्पर्शही झाला नसेल !

"आपल्या नुकत्याच उगवलेल्या शिंगानीं,एकदां इकडे,एकदां तिकडे याप्रमाणें चोहींकडे पहात फिरणाऱ्या लहानशा हरिणबालकाप्रमाणें माझ्या

नवीन उदय पावलेल्या काव्यरचनेची मी आपण होऊन स्वतःला उपाधि लावून घेतली.

## मास्तर !

" एका दिवसाची मला चांगली आठवण आहे, संध्याकाळ होऊन गेली होती. पावसाच्या सरीवर सरी कोसळत होत्या. आमच्या बोळांत गुडघ्याइतकें पाणी झालें होतें. टांक्याचें पाणी बागेत शिरलें होते. झाडांचें झुबकेदार शेंडे पाण्यावर तरंगतांना दिसत होते. कंदबपुष्पांतून सुवास दरवळावा त्याप्रमाणें त्या आल्हादकारक पाऊस पडत असलेल्या संध्यासमयीं आम्हांला आनंदाच्या उकळ्या फुटूं लागल्या ! आतां काय आणखी दोन तीन मिनिटेंच ! तेवढीं निघून गेलीं कीं आमच्या शिक्षकांच्या येण्याची वेळ गेलीच म्हणून समजावें पण छे ! खात्री कोणी सांगावी ! दीनवाण्या चेहेऱ्यानें बोळाकडे पहात तो आतां येईल मग येईल अशी सारखी त्याची वाट पहात व्हरांड्यांत बसून राहिलों होतों. इतक्यांत एकदम आमच्या छातींत धडकी भरली व आम्हांला मूर्च्छा येते कीं काय असें वाटूं लागलें ! ती पहा आमच्या परिचयाची काळी छत्री अशा पावसापाण्याला न जुमानतां त्या कोपऱ्यावरून इकडेच वळली. येणारी व्यक्ति आणखी कोणी तरी नसेल ना ? छे, दुसरी कोण असणार ? त्यांच्या तोडीचा दुराग्रही मनुष्य या विस्तीर्ण जगांत आणखी कोठेंतरी खास सापडला असता, पण आमच्या त्या लहानशा बोळांत कोण मिळणार ?

## पाण्याचे नळ

" कलकत्त्यांत त्यावेळीं पाण्याचे नळ नुक्तेच सुरू झाले होते. आणि नळांच्या प्रथमप्रवेश प्रसंगीं अधिकाऱ्यांना जो विजयानंद झाला होता त्याच्या भरांत त्यांनीं पाण्याची इतकी रेलचेल करून दिली होती, कीं, हिंदी लोकांच्या वस्तींत सुद्धां पाण्याची उणीव नव्हती. नळाच्या त्या पहिल्या अमदानींत त्यांचें पाणी माझ्या वडिलांच्या तिसऱ्या मजल्या-

वरील खोल्यापर्यंतही पोंचत असे. हजाऱ्याची किल्ली फिरवून भलत्याच वेळीं देखील मी त्याखालीं वाटेल तितका वेळ उभा रहात असे. हें सारें मी त्यापासून होणाऱ्या सुखाकरितां करीत असे असें नाहीं, तर फक्त माझ्या कल्पनेप्रमाणें माझ्या इच्छेला स्वैरसंचार करूं देण्याकरितांच करीत असें. एका क्षणीं स्वातंत्र्यसुख तर दुसऱ्या क्षणीं कोणी पाहील कीं काय ही भीति, यामुळें त्या हजाऱ्याच्या पाण्यानें माझ्या अंगावर आनंदाचे रोमांच उभे रहात. बाह्य सृष्टीशीं संबंध येण्याचा संभव फार कमी असल्यामुळेंच हा संबंध घडून येई, तेव्हां त्यापासून होणाऱ्या आनंदाचा वेगही तीव्रच असे. साधनसामुग्री भरपूर असते तेव्हां मनाला मांद्य येतें; व प्रत्येक गोष्टीसाठीं मन तिच्यावरच अवलंबून असतें. आनंदाचा पूर्ण उपभोग मिळण्याच्या कामीं बाह्य सामुग्रीपेक्षां अंतर्गत सामुग्रीचेंच महत्व विशेष असतें याचा मनाला विसर पडतो. मनुष्याच्या बाल्यावस्थेंत मुख्यत्वेंकरून हाच धडा त्याला शिकावयाचा असतो. बाल्यावस्थेंत त्याच्या मालकीच्या वस्तु थोड्या व क्षुल्लक असतात; तरी सुखप्राप्तीकरितां त्याला अधिकांची जरूरी भासत नाहीं. जो दुर्दैवी मुलगा खेळण्याच्या असंख्य वस्तूंसाठीं दडपून गेलेला असतो त्याला त्यापासून कांहींच सुख होत नाहीं.

## माझा एकांतवास

"माझे वडील घरीं क्वचितच रहात असत. नेहेमीं ते कोणीकडे तरी प्रवासांत असत. तिसऱ्या मजल्यावर त्यांच्या निजण्याबसण्याच्या खोल्या होत्या, त्या बहुधा बंद असत. मी वर जाऊन खिडक्यांच्या फटींतून आंत हात घालून दाराची खिटी काढून तें उघडीत असें आणि दक्षिणेच्या टोंकाला असलेल्या त्यांच्या कोचावर स्वस्थ पडून संध्याकाळपर्यंत वेळ काढीत असे. आधींच ती खोली बंद, त्यांतून माझा तिच्यांत चोरूनच प्रवेश झालेला, यामुळें त्या खोलीला गूढतेची विशेषच छटा येत असे. शिवाय दक्षिणेकडील रुंद, विस्तृत व शून्य गच्ची सूर्याच्या किरणांत तळपत असल्यामुळें तिजकडे पहात मी सारखा मनोराज्य करीत बसे.

# कवींद्र रवींद्रनाथ टागोर

## लहान मुलें

" अनुभवानें मला आतां खात्रीपूर्वक असें वाटूं लागलें आहे कीं, वाहत्या प्रवाहाप्रमाणें लहान मुलें चलाख व लवचिक असतात. ही गोष्ट विसरून मोठ्या माणसाच्या वागणुकीचें प्रमाण लहान मुलांच्या वागणुकीला लावणें व त्या दृष्टीनें लहान मुलांच्या वागणुकीचा बरेबाईटपणा ठरविणें ही चुकीची गोष्ट आहे, आणि अशा ठिकाणीं कांहीं कमतरता असल्यास आकाशपाताळ एक करण्याचें तर मुळींच प्रयोजन नाहीं, कारण प्रवाहाचा जोरच सुधारणा करण्याला, असलेले दोष नाहींसे करण्याला उत्कृष्ट साधन होतो; परंतु पाण्याचा प्रवाह बंद पडून त्याचें डबकें होतें तेव्हां मात्र खरी अडचण उत्पन्न होतें ! म्हणून, गैरशिस्त वागणुकीविषयीं सावधगिरी बाळगणें हें विद्यार्थ्यापेक्षां शिक्षकालाच अधिक जरूरीचें असतें !

## माझा हिशेब

" माझ्याजवळ थोडा खुर्दा, थोडें नाणें देवून ठेवून त्याचा हिशेब ठेवण्यास माझे वडील मला सांगत. असें करण्यांत काळजी घेऊन काम कसें करावें हें मला शिकविण्याचा त्यांचा उद्देश असावा. याशिवाय आपल्या बऱ्याच किंमतीच्या सोन्याच्या घड्याळाला किल्ली देण्याचें कामहि त्यांनीं मजकडे सोंपविलें होतें. माझ्याकडे जबाबदारीची कल्पना उत्पन्न करण्याची त्यांना इच्छा असल्यामुळें त्यापासून कांहीं नुकसान होईल इकडे त्यांनीं कधींच लक्ष दिलें नाहीं. आम्हीं बरोबरच सकाळीं फिरावयास जात असूं, त्यावेळीं रस्त्यांत जो जो भिकारी भेटेल त्याला कांहीं तरी भिक्षा देण्यास ते मला सांगत, व घरीं मागाहून मला हिशेब विचारला म्हणजे बरोबर हिशेब मला कधींच देतां येत नसे. एके दिवशीं मी खर्चाचा तपशील दिला ते पैसे वजा जातां जितके पैसे उरावयास पाहिजेत त्यापेक्षां अधिक पैसे शिल्लक राहूं लागले. त्यावर माझे वडील म्हणाले, ' खरोखर तुलाच माझा जामदार केला पाहिजे. कारण तुझ्या हाताच्या स्पर्शानें पैशाची किती तरी वाढ होतेसें दिसतें ! '

## माझें कवित्व

" माझ्या कल्पनाशक्तीपुढें कवि म्हणून मला उभें राहावयाचें होतें म्हणून बोलपूर येथें असतांना मला कविता लिहावयाच्या असल्या म्हणजे नारळीच्या लहानशा झाडाखालीं अस्ताव्यस्त हातपाय पसरून कविता लिहिणें मला फार आवडे. अस्ताव्यस्त हातपाय ताणून पडून कविता लिहिणें हाच खरा कवित्वाचा मार्ग आहे असें मला वाटे ! अशा रीतीनें कडक उन्हामध्यें उघड्या रेताड जमिनीवर पडून ' पृथ्वीराजाचा पराभव ' या विषयावर मी एक वीररसप्रचुर पोवाडा लिहिला. त्यांत वीररस अगदीं ओथंबून गेला होता ! तथापि त्याची लौकरच इतिश्री झाली !

## हिमालयांतील स्वातंत्र्य

" हातांत सोटा घेऊन एका शिखरावरून दुसऱ्या शिखरावर याप्रमाणें मी नेहेमीं भटकत असें. पण माझ्या वडिलांनीं कधींही या कामांत अड-थळा केला नाहीं. जीवमान असेपर्यंत आमच्या स्वातंत्र्यांत त्यांनीं कधींही हात घातला नाहीं, ही गोष्ट माझ्या लक्षांत राहिली आहे. त्यांना न रुच-णाऱ्या व त्यांच्या बुद्धीस अयोग्य वाटणाऱ्या गोष्टी मी पुष्कळ वेळां बोललों आहे, केल्याही आहेत. एका शब्दानें त्यांना मला केव्हांही थांबवितां आलें असतें; परंतु अमुक गोष्ट अयोग्य आहे, ती उच्चारूं नये अगर करूं नये अशी प्रेरणा माझ्या सदसद्विवेकबुद्धीकडून मला होईपर्यंत आपण कांहींच न बोलणें बरें असें त्यांना वाटे. एकादी गोष्ट बरोबर व योग्य आहे, असें अगदीं मुकाट्यानें आम्ही कबूल करणें, हें त्यांना कधींच आवडत नसे ! सत्याची खात्री पटल्यावर मगच आम्ही सत्यावर मनः-पूर्वक प्रेम करावें अशी त्यांची इच्छा असे. प्रेमाशिवाय नुसती कोरडी अनुमती निष्फळ आहे, हें ते जाणून होते. ते हेंही जाणून होते कीं, सत्य रस्ता चुकून कितीहि भटकलें तरी तें पुनः सांपडल्याशिवाय रहावयाचें नाहीं. मनाला पटल्याशिवाय जबरीनें व अंधपणानें सत्याची

वाटणी ग्रहण केल्यास सत्याचा अंत शिरण्याचा मार्ग पक्का बंद झाल्याशिवाय रहाणार नाहीं !

"ज्याप्रमाणें पर्वतांतून वाटेल तसें भटकण्याची त्यानीं मला मुभा ठेविली होती, त्याचप्रमाणें तत्त्वान्वेषणाच्या कामींही स्वतःच आपला मार्ग ठरविण्याला मला मोकळीक होती. मी चुकेन या भीतीनें ते कधींच मार्गे सरले नाहींत ! माझ्यावर संकट येईल या शंकेनें ते कधीं भीतिग्रस्त झाले नाहींत. त्यांनीं माझ्यापुढें आदर्श ठेविला होता; शिस्तीचा दंड हातांत घेतलेला नव्हता !

## शाळेचा तुरुंग

" अंतर्गृहांत प्रवेश झाल्यावर माझा शाळेचा क्रम चालू ठेवणें हें अधिकच कठीण आहे असें मला वाटूं लागलें. बेंगाल ॲकेडमींतून सुटका करून घेण्याकारितां सर्व प्रकारच्या पळवाटांचा मी अवलंब करून पाहिला. त्यानंतर त्यांनीं मला सेंट झेवियर स्कूलमध्यें घालून पाहिलें; परंतु तेथेंही तोच प्रकार !

"लहर आली कीं, माझ्या बंधूनीं माझ्याकडे पहावें, आणि मला सुधारण्याचा जोराचा पण क्षणिक प्रयत्न करावा. असें कांहीं वेळां त्यांनीं करून पाहिल्यावर त्यांनीं माझी आशा सोडली. मला रागें भरण्याचेंही त्यांनीं बंद केलें. माझी सर्वांत वडील बहीण होती ती एके दिवशीं म्हणाली " रवी हा कोणी मोठा मनुष्य होईल अशी आम्हां सर्वांना आशा होती. पण त्यानें आमची पूर्ण निराशा केली ! " आपल्या मंडळींत आपली किंमत खरोखरच कमी होत चालली आहे असें मलाही वाटूं लागलें. तथापि शाळारूपी चक्कीच्या कायमच्या जात्याला आपणांला बांधून घ्यावें असाही कांहीं निश्चय माझ्यानें करवेना ! ती शाळारूपी चक्की ! तींत कांहीं जीव अगर सौंदर्य तर नव्हतेंच, पण शिवाय त्या ठिकाणीं रुग्णालय आणि तुरुंग यांचा हिडिस व क्रूर असा संगम झालेला होता ! "

# प्रकरण दुसरें

## रवींद्रांच्या काव्यकलेचा उन्मेष

रवींद्राना पंधरावें वर्ष लागण्यापूर्वीच त्यांचे एक दोन लेख व कविता छापून प्रसिद्ध झाल्या. ‘ ज्ञानांकुर ’ मासिकांत त्यांचीं कांहीं काव्यें व टीकालेख प्रसिद्ध झाले. रवींद्रांचा भाऊ ज्योतिरिंद्र यानें ‘ भारती’ नांवाचें एक मासिक काढावयाचें ठरविलें होतें. रवींद्र ज्योतिरिंद्राला जाऊन मिळाले, व त्यांच्या प्रारंभींच्या कविता भारतींत प्रगट झाल्या. त्यांचें पहिलें खंडकाव्य ‘ एका कवीची गोष्ट ’ भारतींत प्रथम प्रसिद्ध झाली नंतर तें काव्य जेव्हां पुस्तकरूपानें जनतेच्या पुढें आलें तेव्हांपासून ‘ कवि ’ म्हणून त्यांची सर्वत्र प्रसिद्धी झाली. याच सुमारास त्यांच्या भावगीतांचा एक संग्रह ‘ वनपुष्प ’ या नांवानें प्रसिद्ध झाला. ह्या पुस्तकांतील गीतें त्यांनीं आपल्या वयाच्या अकरा ते पंधरा वर्षांच्या दरम्यान लिहिलीं आहेत. हीं गीतें कोणत्या प्रकारचीं असतील हें पुस्तकाच्या नांवावरून आपल्या यथार्थपणें ध्यानांत येतें. हीं गीतें एका दृष्टीनें कमी प्रतीचीं असलीं तरी त्यांना तात्पुरतें महत्व होतें हें विसरतां कामा नये. रवींद्रांनीं स्कॉट कवीच्या धर्तीवर पोवाडे व काव्यकथा लिहिण्यास सुरवात केली. ‘ गाथा ’ या नांवाचें एक कथाकाव्यांचें पुस्तक प्रकाशित केलें. रवींद्रांचीं ‘ भानुसिंगाचीं गाणीं ’ त्याच सुमाराचीं आहेत.

अशा प्रकारें रवींद्रांच्या काव्योन्मेषाला प्रारंभ झाला./ शेले हा त्यांचा अत्यंत आवडता कवि होता./ नद्या आणि सरोवरें यांचें रमणीय सौंदर्य वर्णन करण्यांत रवींद्रांचें चित्त अगदीं तद्रूप होत असे. त्यांच्या कवितेचा आवडता विषय जललहरींचें विलोल नर्तन हा आहे. नगाधिराज हिमालयाकडे रवींद्राची दृष्टी आकृष्ट झालेली नाहीं. हिमालयाचे विविध व नयनमनोहर देखावे, गगनचुंबी पर्वतशिखरें, घनदाट वनराजी, सृष्टीचा निसर्गरमणीय क्रीडाविलास इत्यादिकांचें रवींद्रांनीं वर्णन केलें असलें तरी त्यांची कविता हिमालयावर लुब्ध झालेली नाहीं. तिनें हिमालय-कन्यकांवर मात्र आपलें प्रेम स्थिर केलें आहे.

## युरोपची पहिली सफर १८७७

२० सप्टेंबर १८७७ रोजीं रवींद्रनाथ विलायतेला गेले व एका वर्षानें परत आले. त्यांना विलायतेंत कांहीं मोठा चांगला अनुभव आला नाहीं, उलट त्यांचें चित्त युरोपाविषयीं दूषितच झालें. इंग्लंड व इंग्रज लोक याबद्दल त्यांच्या मनांत दुर्ग्रह उत्पन्न झाला. हा दुर्ग्रह त्यांची इंग्रजी गीतांजली प्रसिद्ध झाल्यावर निवळला ही गोष्ट निराळी. तरी त्यांच्या पहिल्या सफरीच्या वेळीं तो बलवत्तर होता. त्यांचा विलायतेंतील निवास अगदींच वायां गेला नाहीं. प्रत्यक्ष बर्फ कसें असतें हें त्यांना पहावयास मिळाल्यामुळें त्यांचें कविहृदय उत्तेजित झालें. इंग्लंडहून परत आल्यावर त्यांनीं ‘ युरोपचीं पत्रें ’ ‘ भारती ’ मासिकांत प्रसिद्ध केलीं. ह्याच सुमारास त्यांचे बरेचसे गद्य लेख प्रकाशित झाले. कवितांची संख्या मात्र थोडी होती. त्यांनीं मायकेल मधुसूदन दत्त यांच्या ‘ मेघनाथवधा’वर टीकेचा एवढा हल्ला चढविला कीं त्या टीकेकडे सर्व लोकांचें चित्त वेधून राहिलें. अशी टीका केल्याबद्दल रवींद्रांना आतां हसूं येतें आणि थोडा विषादही वाटतो. पण ह्या टीकेनें रवींद्रांचें नांव ‘ स्वतंत्र व मार्मिक टीकाकार ’ म्हणून प्रसिद्ध झालें.

करुणा नांवाची कादंबरी, रुद्रचंद्र नांवाचें खंडकाव्य, भग्नहृदय नांवाची नाटिका अशा प्रकारें २१ वर्षांच्या अवधींत त्यानीं बरेंच वाङ्मय निर्माण केलें. त्यांच्या मतें त्यांच्या वयाच्या सोळाव्या वर्षापासून ते २३ व्या वर्षापर्यंतचा काल अतिशय अव्यवस्थित रीतीनें कांहींतरी लिहिण्यांत गेला.

### संध्यागीतें

रवींद्रांची जेव्हां संध्यागीतें प्रसिद्ध झालीं तेव्हां त्यांच्यांत खऱ्या व वरच्या दर्जाच्या काव्यशक्तीचा उदय होऊं लागला असें निरपवादपणें जगाच्या निदर्शनास येऊं लागलें. हीं गीतें साकल्यानें पाहिलीं असतां त्यावरून त्यांच्या काव्यशक्तीची जाणवि होत नाहीं. तथापि त्यांत

मधून मधून उत्कृष्ट काव्यबीजें सांपडतांत ही गोष्टही खोटी नाहीं. आणि ह्या गुणामुळेंच त्यांचीं 'संध्यागीतें' बंगाली वाङ्मयांत नव्या धर्तीची अतएव अपूर्व वाटल्यास नवल नाहीं. कवीची निरंकुशता व त्यांची निःप्रतिबंध काव्यशक्ति यामुळें हें काव्य विशेष मनोहर व आकर्षक झालें आहे.

## कारवारचा प्रवास

१८८३ मध्यें रवींद्रबाबूंनीं कांहीं दिवस पश्चिम किनाऱ्यावरील कारवार शहरीं काढले. त्या ठिकाणचें सृष्टीसौंदर्य अपूर्व व हृदयहारी असल्यामुळें रवींद्रबाबूंच्या हृदयावर त्याचा परिणाम झाल्याशिवाय राहिला नाहीं. त्या ठिकाणचा लांबच लांब पसरलेला समुद्राकिनारा व सागरतीरावरील विविध दृश्यें काव्यमय असल्यामुळें रवींद्रबाबूंना फार आनंद होई. त्याच वर्षी डिसेंबर महिन्यांत त्यांचा विवाह झाला.

Heart-Wilderness, प्रभातसंगीत, Pictures & Songs हीं काव्यें कारवारहून आल्यावर त्यांनीं लिहिलीं. संन्यासी ( Nature's Revenge ) व 'मायर खेला' हीं नाटकें त्याच सुमारास त्यांनीं प्रसिद्ध केलीं. 'आलोचना' ह्या पुस्तकांत त्यांचे आजपर्यंतचे किरकोळ टीकालेख, निबंध वगैरे संगृहीत केले आहेत. रविबाबूंच्या टीका मोठ्या मर्मभेदी व परिणामकारक असतात. मेघनादवधावरील त्यांची टीका याच मासल्याची असल्यामुळें तिनें सर्वत्र खळबळ उडवून दिली होती. पुढेंपुढें रविबाबूंनीं टीका करण्याचा पेशा सोडून देऊन आपली लेखणी काव्यदेवतेच्या चरणीं आजन्म वाहिली. त्यांच्या संकीर्ण लेखांचा आणखी एक हप्ता 'समालोचनेचा दुसरा भाग' म्हणून प्रसिद्ध झाला.

रवींद्रनाथ टागोरनीं त्याच सुमारास सामाजिक व राजकीय विषयांवर बरींच भाषणें करून शिक्षणविषयक प्रश्नांनाही त्यांनीं चालना दिली. तरुण वाङ्मयसेवकांत त्यांचा त्यावेळीं चांगलाच बोलबाला झाला होता. प्रथमप्रथम सुप्रसिद्ध बंगाली कादंबरीकार बंकीमचंद्र चतर्जी यांच्याशीं त्यांचें विशेष सख्य व रहस्य असे. पण जेव्हां बंकीमचंद्रांचीं जुनाट

धार्मिक मतें व विचार प्रगट होऊं लागले तेव्हां रविबाबूंचें त्यांच्यांशीं घटेनासें झालें. १८८७ मध्यें हिंदुविवाहपद्धतविर त्यांनीं एक व्याख्यान दिलें तेव्हां तर त्यांच्यावर टीकेचा एवढा वर्षाव झाला कीं पूर्वी तसा कधीं झाला नसेल !

**रवींद्रनाथ वकील** व्हावेत अशी घरांतील सर्व मंडळींची इच्छा होती. रविबाबू जर वकील झाले असते तर एक धनसंपन्न कुबेर झाले असते किंवा प्रसिद्ध न्यायमूर्ती तरी झाले असते. पण जी त्यांनीं अंत-र्राष्ट्रीय कीर्ति संपादन केली आहे, अखिल हिंदुस्थानाला ते जे ललामभूत झाले आहेत आणि त्यांच्यामुळें ही जी भारतभू पुण्यपावन झाली आहे ती कदापि झाली नसती. ते वकील व्हावे अशी परमेश्वरी इच्छा नव्हती. हिंदभूमीला त्यांची गरज होती व त्यांनीं आपलें आयुष्य हिंदभूप्रीत्यर्थ वेंचून खरें राष्ट्रीयत्व उत्पन्न करावें अशी परमेश्वरी प्रेरणा असल्यामुळें ते वकील होऊं शकले नाहींत.

## टागोरांचीं नाटकें

रवींद्रांचीं नाटकें काव्यमय व प्रतीकात्मक आहेत. त्यांच्या नाट-कांत फारच थोडीं पात्रें असून प्रसंगही अगदींच थोडे असतात. त्यांचीं नाटकें त्यांच्या काव्यांप्रमाणेंच गूढगुंजनात्मक असतात. भासकवीच्या नाटकांप्रमाणें त्यांचीं नाटकें छोटींछोटीं असून, 'सूचकता' हा त्यांच्यांत प्रमुख गुणधर्म आढळतो. त्यांच्या नाटकांना 'नाटिका' म्हणणें अधिक शोभेल. वास्तव आणि आदर्श, पृथ्वी आणि स्वर्ग, यथातथ्यता आणि अद्भुतरम्यता ह्या गोष्टींचा मनोहर समन्वय त्यांच्या नाटकांत झाला आहे. पौराणिककथेवर नाटकांचा परिवेष चढविल्यामुळें रवींद्र-नाथांना कथानक धुंडावयाची जरूरी पडली नाहीं. त्यांनीं काढलेली स्वभावाचित्रें अगदीं हुबेहुब वाटतात, इतकीं कीं तीं काल्पनिक आहेत अशी शंकासुद्धां मनांत येत नाहीं.

त्यांनीं आपल्या 'चित्रा' नाटिकेंत प्रेमाचें सुंदर चित्र रंगाविलें आहे. त्या नाटिकेंत शृंगार आहे पण तो विनयाच्या मर्यादेबाहेर गेलेला नाहीं.

प्रेमाचा उत्कट आविष्कार आहे पण त्याचें स्वरूप रम्यमधुर आहे. प्रेमी हृदयाचा धीटपणा आहे पण निर्लज्जता नाहीं.

रविबाबूंच्या King of the Dark Chamber ह्या नाटिकेंत परमेश्वराच्या शोधार्थ आत्मा सबंध विश्व धुंडाळीत आहे पण त्याला अखेरीस परमेश्वर आपल्या हृदयांत सांपडतो असें सांकेतिक व प्रतीकात्मक दृश्य दाखविलें आहे. Post Office मध्यें असेंच प्रतीकात्मक दृश्यकाव्य आहे. परमेश्वर, पुनर्जन्म, आत्म्याचें पुनरुत्थान वगैरे गोष्टी त्यांत गूढस्वरूपांत आल्या आहेत.

' संन्यासी ' मध्यें जगाला विटलेला व संसारापासून अलिप्त असलेला संन्यासी पुन्हां मानवता, भूतदया व विश्वप्रेम यांच्याकडे आकर्षिला जाऊन संन्यासमुक्त होतो, याचें वर्णन आलें आहे. संन्यासी झाला तरी तो भूतदया व मानवता यांना पारखा झालेला नाहीं. जगाशीं असलेला आपला संबंध तुटला आहे, जगाशीं आतां आपलें कांहीं कर्तव्य नाहीं असें त्याला म्हणतां येत नाहीं. विरक्त होणें निराळें आणि संन्यास घेणें निराळें. ही विचारसरणी ' संन्यासी ' मध्यें दिसून येतें.

प्रेमावर सबंध विश्व जिंकून दुष्कृतांना आणि दुर्वृत्तांना सन्मार्गावर आणण्याचें कार्य प्रेमच साध्य करूं शकतें हें तत्त्व ' मालिनी ' नाटिकेंत ग्रथित केलें आहे.

बलिदानाविरुद्ध प्रेमाचा प्रभाव कसा चालतो हें 'बलिदान' नाटिकेंत प्रत्ययास येतें. हिंदुधर्मातील यज्ञाची कल्पना किती निष्ठुरपणाची आहे हें बलिदानावरून स्पष्टपणें ध्यानांत येतें.

शुद्ध प्रेमाचें विषयी प्रेमांत रूपांतर झाल्यावर सर्वस्वाचा नाश आणि स्वतःचा अधःपात कसा होतो याचें दिग्दर्शन ' राजा आणि राणी ' नाटिकेंत केलें आहे.

' The Cycle of Spring ' मध्यें मृत्यु हा पुनर्जन्मच होय हा सिद्धान्त प्रतीकात्मक भाषेंत रवींद्रनाथांनीं प्रस्थापित केला आहे.

Autumn Festival या नाटिकेंत कर्तव्य, वैराग्य आणि सेवा

या गोष्टींची महत्ती वर्णन केली असून द्वेष, गर्व, लोभ या दुर्गुणांची निंदा केली आहे. त्या नाटिकेंत खालील सुंदर गीत दृष्टीस पडतेः—

" I have spread my heart in the sky
 and forund your touch in my dreams.
Take away that veil from your face
 and let me see your eyes.
There rings your welcome at the
 doors of the forest fairies.
Your ankle bells sound in all my
 thoughts filling my work with music.

## टागोरांच्या लघुकथा

रवींद्रनाथांच्या लघुकथा टॉलस्टॉयच्या लघुकथांप्रमाणें विशिष्ट तत्त्व विशद करण्याकरितां म्हणून लिहिलेल्या आहेत. गोष्टीसाठीं गोष्ट म्हणून ते कधींही लिहित नाहींत. त्यांची लिहिण्याची पद्धतही टॉलस्टॉयप्रमाणें प्रतीकात्मक गूढात्मक आहे. साधी गोष्ट पण ते अशा सांकेतिक व सूत्रात्मक पद्धतीनें सांगतात कीं त्यांच्या लघुकथा ' भावगीतें ' च आहेत कीं काय असें वाटल्यावांचून रहात नाहीं. त्यांच्या गोष्टींतून उगीच पात्रांचा व प्रसंगाचा पाल्हाळ नसतो. थोडक्यांत, सुटसुटीत पद्धतीनें लिहिलेली व एकच भावना केंद्रित केलेली अशी त्यांची गोष्ट असते.त्यांच्या गोष्टींतून माधुर्य, रसाळपणा, करुणोदात्तता, शौर्य आणि वैराग्य या गोष्टी प्रामुख्यानें चित्रित केलेल्या असतात. त्यांच्या कांहीं गोष्टी पुढील पुस्तकांत एकत्र केल्या आहेतः—

Glimpses of Bengal Life, Hungry Stones & other Stories, Mashi & other Stories, The Home and the World, Stories from Tagore, Stories of Tagore इत्यादि. ह्या शिवाय त्यांच्या कितितरी लघुकथा मॉडर्न रिव्ह्यूमधून प्रसिद्ध झाल्या आहेत. त्यांच्या लघुकथाबद्दल एका टीकाकारानें काढलेले उद्गार मननीय आहेतः—

" In it ( the short story ) he combines not hard and fast

realism, but the human realities with his romance, and truth to nature attends his wildest apparent improvisations."

## कलादृष्टी

रवींद्रबाबू हे खरे कलावंत आहेत. कला म्हणजे काय याचा त्यांनीं मार्मिक व सूक्ष्म अभ्यास केलेला आहे. कलेविषयीं त्यांनीं काढलेले उद्गार आत्मानुभवावर अधारभूत झाले असल्यामुळें विशेष महत्वाचे आहेत हें सांगणें नकोच. रवींद्रबाबू म्हणतात:—

"ज्ञानविज्ञानाविषयीं मनुष्याला वाटणारें निःस्वार्थी प्रेम आणि भूतदया यावर सुधारणेची उभारणी होत असते. कला म्हणजे व्यक्तिविशिष्ट भावनेचा आविष्कार.मनुष्याच्या अंतःकरणांतील मधुरभावनांना हालविणारा मधुर भाव म्हणजेच रस. कला म्हणजे आत्माविष्कार. मनुष्याचें जीवन 'सत्यं शिवं सुंदरं' करणें हें कलेचें ध्येय."

## टागोरांचे ऐतिहासिक ग्रंथ

हिंदी लोकांचा इतिहास हिंदी लोकांनींच लिहिला पाहिजे असें टागोरांचें आग्रहाचें म्हणणें आहे. दुसऱ्यांना लिहावयाला अधिकारच नाहीं. अशी त्यांची विचारसरणी असल्यामुळें त्यांनीं स्वतः इतिहासक्षेत्रांत पाऊल टाकून हिंदी इतिहासाला शक्य तितका हातभार लावण्याचा प्रयत्न केला आहे. The Philosophy of Indian History या पुस्तकांत रविबाबू म्हणतात कीं हिंदुस्थानचा खरा आणि जिवंत इतिहास हिंदी लोकांनाच लिहितां येईल आणि त्यांनींच तो लिहिला पाहिजे.

My interpretation of Indian History, The Rise and Fall of Sikh Power, the Impact of European India, The Future of India या त्यांच्या ऐतिहासिक लेखांत हिंदी दृष्टीनें व हिंदी पद्धतीनें खराखुरा इतिहास कसा लिहावा याचें त्यांनीं साधार विवेचन केलें आहे. हिंदुस्थानच्या उज्वल भवितव्याचें रवींद्रनाथ खालीलप्रमाणें चित्र काढतात:—

" Then in India province will join province, race will join race, knowledge will be linked with knowledge, endeavour with endeavour; then the present chapter of India's History will end, and she will emerge in the larger history of the world. "

हिंदुस्थानचें सर्वांगीण ऐक्य झाल्याशिवाय आणि हिंदुस्थान अखिल जगाशीं समरस झाल्याशिवाय हिंदुस्थान उत्कर्ष पावणार नाहीं.

## रवींद्रबाबूंचीं ऐतिहासिक काव्यें

चालू परिस्थितीचा वीट आल्यामुळें रवींद्रबाबूंचें मन ऐतिहासिक काळांत विहार करूं लागलें. शौर्यवीर्याच्या गोष्टी निवेदन करण्यांत त्यांना एक प्रकारचा आनंद वाटूं लागला व ते बंगाल, महाराष्ट्र व पंजाब यांच्या प्राचीन इतिहासाकडे वळले. मराठे व शीख यांच्या शौर्याचे किती पोवाडे गावे यांबद्दल त्यांचे त्यांनाच कळेना. रविबाबूंचे ऐतिहासिक पोवाडे त्यांच्या काव्याइतकेच प्रसिद्ध आहेत. १८९७ ते १९०० या दरम्यान त्यांनीं पांच पुस्तकें प्रसिद्ध केलीं— ' कल्पना, ' ' कथा, ' ' काहिणी, ' 'कणिका,' व 'क्षणिका.' शेवटच्या पुस्तकांत त्यांनीं अगदीं घरगुती भाषा वापरली असून त्याची शैलीही अगदीं हंसती खेळती आहे. पुस्तकाचा विषय संसाराची क्षणिकता हा असून क्षणिकतेंतसुद्धां कसें माधुर्य, कसें काव्य असतें हें त्यांनीं त्यांत दर्शविलें आहे. 'कल्पना' काव्यांत हिंदुस्थानाच्या प्राचीन इतिहासाबद्दल गौरवोद्गार काढले असून ती स्थिति नष्ट झाल्याबद्दल त्यांनीं दुःखोद्गार काढले आहेत. ' कल्पना' काव्य काव्यदृष्ट्या वरच्या दर्जाचें असून विशेष महत्त्वाचें आहे. कणिका या पुस्तकाचें इंग्रजी भाषांतर Stray Birds या नांवानें झालें आहे.

## वंगदर्शनाचे संपादक

१९०१ सालीं वंगदर्शन या बंगाली मासिकाचें पुनरुज्जीवन झाल्यावर रवींद्रबाबूंची योजना त्याच्या संपादकाच्या जागीं झाली. रविबाबूंच्या हातीं संपादकीय सूत्रें आल्यावर त्यांना कादंबरीलेखनाची स्फूर्ति आली व ते थोड्याच दिवसांत वरच्या दर्जाचे कादंबरीकार

म्हणून प्रसिद्धीस आलें. त्याच वर्षी त्यांनीं बोलपूर नजीक आपल्या आश्रमाची संस्थापना केली. हाच आश्रम शांतिनिकेतन या नांवानें पुढें लवकरच जगद्विख्यात झाला. १९०१–१९०७ या कालाच्या दरम्यान त्यांनीं बऱ्याच कादंबऱ्या लिहिल्या व कवीच्या कीर्तीबरोबर कादंबरीकाराचीही कीर्ति मिळविली. त्या अवधींत त्यांनीं 'गोरा' ही मोठी कादंबरी प्रसिद्ध केली. रशियन कादंबऱ्यांतून ज्याप्रमाणें सूक्ष्म पण विस्तृत वर्णनें खेंचून भरलेलीं असतात त्याप्रमाणें रविबाबूंनीं वर्णनांच्या सहाय्यानें आपली कादंबरी बरीच विस्तृत केली. कवींना आधींच वर्णनाची हौस कमी, त्यांत कादंबरीसारखें वर्णनातिशयाला अनुकूल असें क्षेत्र अनायासें सांपडलेलें, मग वर्णनांच्या बाबतींत कवींचा कुणाला हात धरतां येईल? ही कादंबरी सामाजिक असून तिच्यांत एक हृदयद्रावक चित्र रेखाटलें आहे. गोरा हा इंग्रज आईबापांच्या पोटीं जन्मलेला मुलगा होता, पण'५७ सालच्या रणधुमाळींत आईबापांची व त्याची ताटातूट होऊन तो एका बंगाली स्त्रीला सांपडला. तिनें त्याचें पालनपोषण केलें. त्याला वाटत होतें कीं आपण बंगालीच आहों. तो लहानपणापासून मोटा इंग्रजद्वेष्टा होता. अखेर त्याच्या बंगाली आईनें त्याला त्याचा जन्मवृत्तांत सांगितला. ह्या कादंबरीचें मूळ बंगाली नांव 'किम्' आहे.

**पत्नीचा वियोग**—१९०२ साल हें त्यांना अत्यंत वाईट गेलें. त्याच वर्षी त्यांच्या आवडत्या पत्नीचा मृत्यु ओढवल्यामुळें त्यांची स्थिति अत्यंत चमत्कारिक होऊन गेली. त्यांना कित्येक दिवस कांहीं सुचेना, त्यांचें चित्त शोकावेगानें भरून गेलें. त्यांच्या अंतःकरणांत वैराग्य उत्पन्न होऊन चित्तस्वास्थ्यासाठीं ते हिमालयांत निघून गेले. त्यांचा छोटा मुलगा आणि त्यांची एक मुलगी अगदीं मृत्युशय्येला खिळली असल्यामुळें त्यांचें सर्व लक्ष त्यांच्या भोंवतीं होतें. त्या मुलांना घेऊन ते हिमालयांत अल्मोरा गांवीं गेले व तेथें त्यांना स्वास्थ्य लाभलें. १९०५ पर्यंत त्यांची 'स्मरण,' 'स्वदेशसंकल्प,' 'खेया' वगैरे काव्यें व 'The Wreek' ही कादंबरी प्रसिद्ध झाली.याच सुमारास त्यांचा लहान मुलगा वारला.

**त्यांचें पुढील वाङ्मय**—१९०१ मध्यें नैवेद्य, १९०८ मध्यें Autumn Festival १९०९ मध्यें गीतांजली, १९१० मध्यें 'राजा' १९१२ मध्यें ' डाकघर ', याप्रमाणें त्यांनीं काव्यें व नाटिका प्रसिद्ध केल्या. ' शांतिनिकेतन ' या नांवाच्या पुस्तकांत त्यांनीं आपले कित्येक लेख समाविष्ट केले आहेत.

' राजा' (The King of the Dark Chamber) या नाटिकांत 'सूचकता ' जवळजवळ पूर्णावस्थेला गेल्यासारखी वाटते. ह्या नाटिकेंत रवींद्रांची लोकसत्तात्मक राज्यपद्धतीची काय कल्पना आहे ती आपल्याला पहावयास सांपडते. हिंदुस्थान हें लोकसत्ताक होणें शक्य आहे, अशी त्यांची स्वतःची खात्री आहे. ह्या नाटिकेंतील राजा आपले कोणतेही अधिकार चालवीत नाहीं. राजाची भूमिका इतकी अस्पष्ट व अंधुक दाखविली आहे कीं सामान्य मनुष्याला त्याचा सहज उलगडा व्हावयाचा नाहीं. डाक घर (Post office) ही प्रतीकात्मक नाटिका संबंध युरोपांत अत्यंत लोकप्रिय झालेली आहे. रंगभूमीवर ह्या नाटिकेचे सर्वांत जास्त प्रयोग झाले आहेत.

# प्रकरण तिसरें

## कीर्तिलाभ

सुमारें एक दीड वर्ष त्यांनीं आपल्या आश्रमांतच ध्यानचिंतनमननांत घालविलें. रविबाबूंची विलायतेची तिसरी सफर याच सुमारास झाली. ही त्यांची सफर त्यांचें नांव त्रिखंडाविख्यात करण्यास कारणीभूत झाली असल्यामुळें फार महत्त्वाची आहे. इतके दिवस मातृभाषेच्या अभिमानानें त्यांनीं आपलें सर्व लिखाण बंगाली भाषेंत लिहिलें होतें. पण इंग्लंडला जाण्यापूर्वीं त्यांनीं आपल्या कांहीं काव्यांचें इंग्रजी भाषांतर केलें व इंग्रज जनतेला दाखविण्याकरितां व त्यांचा अभिप्राय घेण्याकरितां त्यांनीं तें सर्व आंग्लसाहित्य आपल्याबरोबर घेतलें. रवींद्रबाबूंची जी जगांत ख्याती झाली ती त्यांनीं आपले ग्रंथ इंग्रजींत अनुवादित केले म्हणूनच झाली यांत शंका नाहीं. रवींद्रबाबूंनीं आपली गीतांजली नोबेल प्राइझमन व सुप्रसिद्ध कवि/डब्ल्यू.बी.यीटस्/यांना दाखविली. ती वाचून यीटस् यांना अत्यानंद झाला व त्यांनीं ह्या भारतीय कविवर्याचें मनःपूर्वक अभिनंदन केलें. इतर कवींनींही टागोरांच्या काव्याच्या उत्कृष्टपणाबद्दलचे पोवाडे गायिले. हळूं हळूं त्यांचीं सर्व काव्यें व नाटकें युरोप व अमेरिकेंत प्रसिद्ध झालीं व लोकांना त्यांनीं वेड लाविलें. त्यांच्यावर लोकांनीं इतका स्तुतिसुमनांचा वर्षाव केला कीं अभूतपूर्वच.इंग्लंडची ही विजयशाली सफर आटपून ते जेव्हां हिंदुस्थानाला परत आले तेव्हां हिंदी लोकांना त्यांच्या गुणांची खरी किंमत कळली व रविबाबूंचा सर्वत्र मोठ्या आदरानें व उत्साहानें सत्कार झाला.रविबाबू हिंदुस्थानांत असतांना त्यांचीं काव्यें केवळ बंगालींतच असल्यामुळें त्यांचा रसास्वाद इतर प्रांतांना मिळूं शकला नाहीं. हिंदी लोकांत रसिकता नाहीं म्हणून रविबाबूंना हिंदुस्थान ओळखूं शकलें नाहीं असा त्याचा अर्थ नाहीं. आशियाखंडाचे कविसम्राट् म्हणून जेव्हां त्यांना १९१३ सालीं नोबेलप्राईझ देण्यांत आलें तेव्हां त्यांच्यावर तर पदव्यांचा, सन्मानांचा नुसता वर्षाव झाला. कलकत्ता विद्यापीठानें त्यांना डॉक्टर ऑफ लिटरेचर ( साहित्याचार्य ) ही पदवी

दिली. हिंदुस्थान सरकारनें १९१४ सालीं त्यांना ‘ सर ’ हा किताब अर्पण करून त्यांच्याविषयीं पूज्यताबुद्धी व गुणग्राहकता दर्शविली.

त्यांना जेव्हां नोबेल प्राइझ मिळाल्याची तार आली त्यावेळीं रात्र झालेली होती आणि विद्यार्थी गायनानंदांत निमग्न झालेले होते. ती तार वाचल्याबरोबर त्यांच्या तोंडून ‘ आतां ’ ह्यापुढें मला शांतता मिळावयाची नाहीं ’ असे उद्गार अभावितपणें एकदम बाहेर पडले. रवींद्रबाबूंना नोबेल प्राइझ मिळाल्याची वार्ता दुसरेच दिवशीं हिंदुस्थानभर पसरली. लोकांची त्यांच्याकडे एकसारखी येजा सुरू झाली, त्यांच्याकडे हजारों अभिनंदनाचीं पत्रें येण्यास सुरवात झाली व अनेकांकडून त्यांच्याकडे पुस्तकांच्या प्रस्तावनेसाठीं मागण्या आल्या. त्यांनीं सर्वांचें समाधान केलें व कोणालाही विन्मुख पाठविलें नाहीं. त्यांना अनेक संस्थाकडून निमंत्रणें आलीं, लेख लिहिण्याबद्दल विनंत्या आल्या, संदेशाबद्दल मागण्या आल्या. वर्तमानपत्रांनीं मुलाखतीसाठीं त्यांची तर पाठ पुरवली.

रवींद्रनाथांना नोबेल पारितोषक मिळाल्याची गोष्ट जेव्हां जगजाहीर झाली तेव्हां त्यांच्यावर साहजिकच अभिनंदनपर पत्रांचा व तारांचा वर्षाव होऊं लागला. हें पारितोषिक मिळाल्याचें पाहून टागोरांना आश्चर्य वाटलें नाहीं. त्यांना पूर्वीच अंधुक बातमी होती. पण हें बक्षिस मिळाल्याचें पाहून त्यांनीं आनंद प्रकट करण्याचे ऐवजीं खेदच प्रगट केला. ते म्हणाले ‘ मला आतां यापुढें मनःस्वास्थ्य लाभणार नाहीं. माझ्यावर पत्रांचा वर्षाव होईल व ठिकठिकाणीं माझें प्रदर्शन मांडलें जाईल. ’ टागोरांच्या एकांतप्रियतेला व अप्रसिद्धीला ह्या पारितोषिकामुळें मोठाच धक्का बसला, ही गोष्ट कबूल करणें भाग आहे. टागोरांनी ही गीतांजली लिहिली त्यावेळीं त्यांचें वय एकावन्न वर्षांचें होतें. म्हणजे त्यांच्या आयुष्याच्या मननात्मक व निदिध्यासाच्या अवस्थेला सुरवात झालेली होती. ते कित्येक वर्षे अध्यात्मचिंतनांत व आत्मपरीक्षणांत आपला काल घालवीत असत. ह्याच आत्मशोधनाच्या कालांत गीतांजली निर्माण झालेली आहे.

**गीतांजलीचें इंग्रजी भाषांतर** रवींद्रबाबूंनीं स्वतः केलें. त्यांचें इंग्रजी भाषेवरील प्रभुत्व पाहून कित्येक इंग्रजांना आश्चर्य वाटलें. तर कित्ये-

कांना हें भाषांतर त्यांचें नसावें अशीही शंका आली. परंतु ती अगदींच निराधार होती. त्यांचें इंग्रजी शुद्ध, सरस व रसपूर्ण आहे. गीतांजलीची जर्मनी, हॉलंड, स्कँडिनेव्हिया, फ्रान्स इत्यादि देशांतून भाषांतरें झालीं व तीं जगांतील सर्व लोकांना सुलभ झालीं. पाश्चात्य राष्ट्रांना हिंदी राष्ट्राची अध्यात्मिकता आकलन होणें शक्य नाहीं, अशी कित्येक हिंदी लोकांची कल्पना होती, परंतु गीतांजलीचा जो जगभर प्रसार झाला त्यावरून ती निर्मूल होती हें सिद्ध आहे. रवींद्रबाबूंच्या इंग्रजी गीतांजलीला सुप्रसिद्ध कवि डब्ल्यू बी. यीटस् यांनीं प्रस्तावना लिहिल्यामुळें त्यांचें पुस्तक जगद्विख्यात होण्यास मदत झाली.

## जपानची सफर

रविबाबूंची कवि या नात्यानें जी कीर्ति पसरली ती चीनजपान-सारख्या पौर्वात्य राष्ट्रांत पोंचल्यावांचून राहिली नाहीं. १९१६ मध्यें त्यांनीं जपानचा दौरा काढला व तेथें राष्ट्रीयत्वावर व्याख्यानें दिलीं. अध्यात्मिकतेशिवाय राष्ट्राचा तरणोपाय नाहीं आणि अध्यात्मिकतेच्या सहाय्यानेंच राष्ट्राचा उद्धार होईल, आधिभौतिक सुधारणांनीं होणार नाहीं अशी विचारसरणी त्यांनीं आपल्या व्याख्यानांतून मांडली.जपानी लोकांनीं स्वतःची उन्नति करून घेतलेली असल्यामुळें आणि त्यांचें राष्ट्र आधिभौतिकवादी असल्यामुळें त्यांना साहजिकच रविबाबूंचें तत्त्वज्ञान रुचलें नाहीं व त्यांनीं कविवर्यावर टीकेचा गहजब उडविला.

जपानमधून ते अमेरिकेंत गेले व तेथें त्यांनीं Personality ( व्यक्तित्व ) या विषयावर व्याख्यानें दिलीं. त्यांची ही सफर चांगलीच यशस्वी झाली व त्यांचें नांव सर्वत्र दुमदुमलें.

## पदवीचा त्याग

१९१९ सालचे पंजाबांतील अत्याचार आणि अमृतसरची कत्तल या गोष्टींमुळें रविबाबूंच्या अंतःकरणांत क्षोभोद्वेगाच्या लहरी उसळूं लागल्या. त्या भरांत त्यांनीं तत्कालीन व्हाईसरॉय यांना एक लांबलचक पत्र लिहून आपण ‘ सर ’ ह्या पदवीचा त्याग पंजाबप्रकरणाच्या निषेधार्थ करीत

आहोंत असें कळाविलें. ' अशा परिस्थितींत असलेल्या सरकारकडून मिळालेल्या मानाच्या पदव्या धारणें ही वास्तविक नामुष्कीची व नाचक्कीची गोष्ट आहे. ' असे उद्गार त्यांनीं त्या पत्रांत काढले.

## पुन्हां इंग्लंड

१९२० सालीं त्यांची इंग्लंडला पांचवी खेप झाली पण ती अगदीं निष्फळ ठरली. त्यावेळीं त्यांच्याकडे कोणी लक्षही दिलें नाहीं, कीं त्यांचीं भाषणें ऐकण्याची उत्सुकताही दर्शविली नाहीं. त्यांची लोकप्रियता ओहोटीस लागली कीं काय कोण जाणें ! इंग्लंडमधून लगेच त्यांनीं प्रयाण केलें व फ्रान्स, जर्मनी, स्वीडन, डेन्मार्क, व अमेरिका इत्यादि ठिकाणीं त्यांनीं प्रवास केला. त्या देशांत त्यांचें उत्तम स्वागत झालें.

## रशियाची सफर

१९२३-२४ सालीं रवींद्रबाबूंनीं आणखी एक इंग्लंडची सफर केली. जवळ जवळ सबंध जगाचा त्यांनीं प्रवास केला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.ज्या ज्या देशांत ते गेले त्या त्या देशांनीं त्यांचा गौरव केला. रशियाच्या नवीन समाजसत्तावादाचें निरीक्षण करण्यासाठीं १९३० सालीं ते मुद्दाम रशियांत गेले होते. तेथील कलाविषयक संस्थांना त्यांनीं भेटी दिल्या, प्रमुख लोकांना मुलाखती दिल्या व आपलें अंतर्राष्ट्रीय तत्त्वज्ञान त्यांच्यापुढें मांडलें. रशियाची नवसमाजघटना त्यांना मनापासून पसंत पडली.

- रशियांतील उद्योगधंद्यांची योजना, यांत्रिक शेतकी, शास्त्रीय संशोधन, शिक्षण व संस्कृति यासंबंधीं रवींद्रनाथांचें काय मत आहे तें समजून घेण्याकरितां मास्कोचे प्रो. पेट्रॉफ यांनीं ऑक्टोबर १९३१ मध्यें रवींद्रनाथांना तार केली. ती तार सरकारनें आक्षेपार्ह ठरविली, परंतु नंतर रवींद्रबाबूंच्याकडे पाठविण्यास परवानगी दिली. पेट्रॉफनीं हिंदुस्थानच्या भवितव्याबद्दलही एक प्रश्न विचारला होता. ह्या तारेला रविंद्रबाबूंनीं

पुढील उत्तर दिलें.—' संपत्तीचा ओघ व्यक्तींकडून समुदायाकडे वळविल्यामुळें रशियाला हें अपूर्व यश मिळवितां आलें आहे. हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याच्या मार्गांत अज्ञान, धार्मिक वेडगळपणा, व सामाजिक मूर्खपणा या गोष्टी प्रामुख्यानें आहेत.' रवींद्रनाथांना रशियाबद्दल विशेष आकर्षण वाटलें ही गोष्ट विशेष नमूद करण्यासारखी आहे. रशियांतून आल्यावर त्यांनीं The Soviet system या नांवाचे लेख लिहिले व ' रशियाचीं पत्रें ' या नांवाचें एक पुस्तक बंगालींत प्रसिद्ध केलें.

The Soveit system या लेखांत रवींद्रबाबूंनीं खालील उद्गार काढले आहेत:—

" When I went to Russia and saw that very greed was chastened, I felt a great joy. For I cannot rid my mind of the central idea behind this, which is that, not only in India, but all over the world, where-ever one sees a net of great danger spread, there the inspiration always comes from greed......In Soviet Russia the various subjects of the Russian State, irrespective of race and class, have been honoured by receiving equal rights and opportunites for real education. This matter has been a source of deep gratification to me."

( Modern Review Sept. 1931 ).

# प्रकरण चवथें

## गीतांजली

गीतांजली हा रवींद्रनाथांच्या कीर्तिशिखराचा सुवर्णकळस होय. देवळांतील देवाचें प्रत्यक्ष दर्शन झालें नाहीं तरी कळसाचें दर्शन घेतल्यानें देवाच्या दर्शनाइतकेंच पुण्य व श्रेय मिळतें अशी भाविकांची दृढ समजूत आहे. ह्याच तत्त्वानुसार रवींद्रनाथांच्या वाङ्मयमंदिरांत प्रवेश करून त्यांच्या 'वाङ्मयी मूर्ती'चें दर्शन घेणें ज्यांना अशक्य असेल त्यांनीं नुसत्या गीतांजलीचें जरी दर्शन घेतलें तरी त्यांना रवींद्र–मूर्तीचें मनोमय दर्शन झाल्याशिवाय रहाणार नाहीं. रवींद्रबाबूंच्या तत्त्वज्ञानाचें सारसर्वस्व, त्यांचा अध्यात्माचा जगाला संदेश व त्यांचें खरेंखुरें अंतःकरण गीतांजलींत प्रतिबिंबित झालेलें आहे. गीतांजली हा त्यांच्या काव्यप्रतिभेचा उत्कृष्ट आदर्शच असें म्हणावयास प्रत्यवाय नाहीं. गीतांजली हें एक सलग असें दीर्घ काव्य नाहीं. मनन करतांना वेळोवेळीं सुचलेले व वेळोवेळीं स्फुरलेले स्फूर्तीचे तेजस्वी कण यांत एकत्रित केले आहेत. अव्यक्त परमेश्वराच्या चरणीं ही हृदयोद्गारांची अंजली समर्पण करण्यांत आलेली आहे. रवींद्रबाबूंनीं निरनिराळ्या वेळीं जीं निरनिराळीं काव्यें लिहिलीं, त्या काव्यांतून भक्तिरसानें आर्द्र झालेलीं निवडक वाक्पुष्पें बाजूला काढून त्यांची ही अंजली तयार केली आहे. परमेश्वराला वहाण्यासाठीं जी पुष्पमाला तयार करावयाची ती उत्कृष्ट असावयास नको कां? गीतांजली, गीतिमाल्य, नैवेद्य, खेया, शिशु, चैताली, स्मरण, कल्पना, उत्सर्ग व अचलायतन ह्या काव्यांमधून निवडक रत्नें वेंचून ही गीतांजली निर्माण करण्यांत आली आहे. गीतांजलींत एकुण १०३ गीतें आहेत.

गीतांजलीत हृदयाचे आर्तोद्गार असले तरी तिच्यावर मधूनमधून जें काव्यालंकाराचें लेणें चढविण्यांत आलें आहे त्यामुळें स्वाभाविकतेचा लोप झाला आहे व क्वचित् कृत्रिमतेचीही छटा आली आहे. काव्यशक्ति व बुद्धिमत्ता यांच्या अभिनिवेशांत साहजिकपणावर क्वचित् छाया पडली आहे.

गीतांजलींतलि विचारांचा अंतःप्रवाह शुद्ध भारतीय आहे. त्यावर कोणत्याही परधर्मांतील विचारांची छाया पडलेली नाहीं. गीतांजलीची भाषासरणी व निवेदनपद्धती बायबलासारखी असल्यामुळें गीतांजलीवर बायबलाची छाया पडली आहे, गीतांजली बायबलावरून अनुवादित केली आहे असें कित्येक ख्रिस्ती पंडित अभिनिवेशपूर्वक प्रतिपादूं लागले. कित्येकांनीं रवींद्रबाबूंना ही गोष्ट जेव्हां समक्षच विचारली तेव्हां रविबाबू उद्गारले ' तुम्हांला या गोष्टीचें आश्चर्य वाटेल, पण मी अद्याप बायबल वाचलें नाहीं ' रविबाबूंची विचारपद्धति वास्तविक पहातां सूत्रमय आहे. त्यांची वाक्यें छोटींछोटीं असलीं तरी तीं आत्मानात्मविचारांनीं भारावलेलीं असल्यामुळें अवजड आहेत. उपनिषदांची सरणी ही अशीच. रवींद्रबाबूंनीं गीतांजली लिहिल्यानंतर मात्र त्यांनीं ख्रिस्ती धर्मवाङ्मयाचा परिचय करून घेतला.

गीतांजलीला आधुनिक युगाचें धर्मपुस्तक म्हणतां येईल. प्रत्येक व्यक्तीचें अंतःकरण कांहीं तरी अननुभूत, अपूर्व व अदृश्य अशा मनोव्यथेनें नेहमीं तरलित झालेलें असतें. ही हृदयव्यथा इतक्या सूक्ष्म स्वरूपाची असते कीं ती कशामुळें उत्पन्न झालेली आहे याचा शोध त्या व्यक्तीला लागत नाहीं. हृदय कशासाठीं व्याकुळ झालें आहे, अंतर्हृदय कशासाठीं उत्कंठित झालें आहे याचें ज्ञान त्या व्यक्तीला होत नाहीं. मात्र गीतांजलीसारखें काव्य हातीं आलें म्हणजे त्या व्यक्तीला एक प्रकारचें अद्भुत व अननुभूत शांतिसमाधान लाभल्यासारखें वाटतें. शांतिसमाधानाचा ठेवा ज्यांत भरलेला आहे तोच खरा धर्म. धर्म हा मानसिक व हार्दिक उत्कंठांची परिपूर्ती करणारा व आत्मिक समाधान देणारा एक दिव्य कल्प आहे. गीतांजली वाचून आत्मिक आनंद व शांती यांचा लाभ होत असल्यामुळें गीतांजलीला धर्मपुस्तक कां म्हणूं नये ?

" ज्या ग्रंथानें आपल्या अतुल परिमलानें पाश्चिमात्य पंडित—भ्रमरांना गुंगवून सोडलें आहे, ज्यानें आपल्या कर्त्यास ' आशियाखंडाचा राजकवि ' असा स्पृहणीय मान मिळवून दिला, ज्यानें जगांतील विख्यात अशा ' नोबेल प्राइझ ' वर आपला हक्क सांगितला, त्या गीतांजलि-

काव्याची ओळख आम्हां महाराष्ट्रीयांस अगदीं नवीनच आहे. प्रस्तुतचें काव्य नुसत्या तत्त्वज्ञानानें भरलेलें असल्याकारणानें व तत्त्वज्ञान हें महाराष्ट्र भाषेच्या रोमरोमीं वास करीत असल्यामुळें तिला गीतांजली-सारख्या ग्रंथाचें विशेष वाटत नाहीं. किंवा महाराष्ट्रभाषा कर्तव्यपराङ्मुख आहे—नव्हे सांप्रत बनली आहे—त्यामुळें गीतांजलीवर उत्कृष्टत्वाचा इंग्रेजी छाप बसेपर्यंत ती महाराष्ट्रास अपरीचितच होती. असो.

गीतांजलि म्हणजे परमेश्वरास वाहिलेली १०३ गीतांची माला होय. मूळ ही वंगभाषेंत गुंफिली आहे व स्वतः कवीनेंच तिचें इंग्रजींत भाषांतर केलें आहे. मूळ आणि भाषांतर यांमधील स्वारस्यभिन्नता लक्षांत घेतली, तरी भाषांतरित गीतांजलि इंग्रेजी वाङ्मयांत व विचारांत चांगलीच खळबळ उडवून देईल, असें अमेरिकाइंग्लंडांतील साहित्यसेवकांनीं जे उद्गार काढले आहेत, त्यांवरून पाहतां इंग्रजी भाषेवर कवीचें बरेंच प्रभुत्व आहे, हें तर स्पष्ट होत आहेच; परंतु मूळकाव्यांतील ओघ भाषांतराच्या खडकावर आपटूनसुद्धां पुनरपि पहिल्याच जोमानें वाहत आहे यावरून त्याच्या सरसत्वाची कल्पनाहि करतां येणारी आहे. ‘ या गीतांजलीनें आम्हां पाश्चात्त्यांच्या मनावर व आमच्या कल्पनाशक्तीवर अशी अढळ छाप बसाविली आहे कीं, तिच्यामुळें रवीन्द्रबाबूंचें नांव प्रत्येक सुशिक्षितगृहांत थोरांपासून लहानांच्या मुखीं झालें आहे, ’ इतकी ख्याति पाश्चात्त्यांत प्रस्तुत ग्रंथासंबंधानें झाली आहे. एवढेंच काय, पण ‘ रवीन्द्रनाथांच्या ग्रंथांचें परिशीलन करणें, त्यांच्या ग्रंथांतील एकादी ओळ वाचणें, म्हणजे ऐहिक तापांना विसरून जाण्यासारखें होय ’ असे उद्गार कित्येकांच्या तोंडून निघत आहेत. तेव्हां अर्थात् हें काव्य इतकें लोकप्रिय होण्यास यांत गुणहीं तसेच पाहिजेत, व ते आहेतही. त्यांतील कल्पना आणि माधुर्य, त्यांत ओथंबलेल्या मनोवृत्ति व वरचेवर उद्भूत होणारे आत्मिक स्फुलिंग, या गुणांनीं परिप्लुत असें हें काव्य आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे **‘ गीतांजलि ’रवीन्द्रबाबूंच्या प्रज्ञाशक्तीचें विजयतोरणच होय; ’** कवीनें आपल्या हृदयांतील आकांक्षांना व विचारांना आपल्या कवितेंत स्थान दिलें असल्यामुळें त्यांत त्यांच्या नाना-

तऱ्हेच्या मनोवृत्तींचीं प्रतिबिंबें उमटलेलीं आहेत. काव्यांतील विचारसरणी हिंदी मनुष्यास साजेल अशीच आहे. यामुळें त्यांतील विचार, विकार व संवेदना हे आपणांस आंग्लविचारांप्रमाणें अगदींच परके नाहींत. ज्या विचारांनीं व आचारांनीं रवीन्द्रबाबूंच्या मनोवृत्ति शांत, आनंदी अथवा उत्तेजित होत असतात, तेच विचार व आचार आमच्याही वृत्ति तशाच करून सोडतील. या काव्यांत ठिकठिकाणीं सात्त्विक विनोद भरला आहे. मधूनमधून त्यांत करुणरसाचाही ओघ वहात आहे. शिवाय त्यांत असा एक विशेष गुण आढळून येतो कीं, तें वाचीत असतांना कवीच्या हृदयाचा किंबहुना सगळ्या बंगाली हृदयाचा एकेक पडदा उघडून आपण आंतील कोमल भाग पहात आहोंत असें वाटतें. या वैशिष्ट्यामुळें रवीन्द्राना तत्कालीन विचार व भावना यांचा प्रतिध्वनि काढणारे ' प्रातिनिधिक कवि ' असें म्हणतात.

' गीतांजली ' हें काव्य अथपासून इतिपर्यंत अध्यात्मपर आहे. सर्वांत श्रेष्ठ अशा या अध्यात्मवादाची निवड केली असल्यामुळें त्यांत गूढार्थत्व सर्वत्र भरलेलें आहे. हा गूढार्थ उकलल्यावांचून काव्यांतील खरें मर्म समजणें कठीण जातें. कित्येकांस तर या गूढार्थाची वास्तविक कल्पना न आल्यामुळें गीतांजलींतील सौंदर्यास त्यांना मुकावेंही लागतें. तरीसुद्धां प्रस्तुत काव्य जितकें गूढ आहे, तितकेंच मनोवेधकही आहे. कधींही नाहींशा न होणाऱ्या सत्तत्वांचा गूढतर संदेश वाचकांचे मनावर ठसल्यावांचून रहात नाहीं. जन्म व मृति यांचा कंटाळा न येतां त्यांविषयींची उत्कंठा बाळगणें, सृष्टिसौंदर्यांत रत होणें, मनुष्यांच्या—आपल्या बंधूंच्या—उपयोगीं पडणें, ईश्वराचा शोध करणें व त्याचे चरणीं लीन होणें, या गोष्टींचा येथें आढळ होत आहे.

हें जग केवळ माया आहे, तें नश्वर आहे, अतएव त्याचा त्याग करावा, या नेहमींच्या विचारसरणीनें कवीनें आपली जीवनतृष्णा शमविली नाहीं; तर त्यांतील ईश्वरांश शोधून काढून ज्या गोष्टी ' प्रभूच्या मार्गांत आडव्या ' आल्या असतील त्यांचा सत्कृत्याचें कामीं उपयोग करून

घेण्यानें ती शमविली आहे. या संसारांतील दुःखांचा, या सगळ्या आधिभौतिक तापांचा आत्मिक उन्नतीकडे उपयोग करून घेतला आहे. ' आशियाखंडाच्या राजकवीनें आपली तुतारी फुंकून त्यांतून हें विश्व तालबद्ध व आनंदमय असून ' पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात्पूर्णमुदच्यते ' असा आशावादी सूर काढिल्यामुळें प्रतीची जागृत झाल्याप्रमाणें दिसूं लागली. इंग्लंड व अमेरिका या दोन्ही देशांतील बहुजनसमाजाच्या कर्णरंध्रांत तो नाद दुमदुमून त्यांना आपला चटका लाविला ! पौर्वात्य कोकिलेनें आपल्या मधुर पण भेदक रवानें पाश्चात्य जडतेला चैतन्यमुक्त केलें. भौतिक सुधारणेच्या नादीं लागलेल्या समाजांत जडवादाचा जो वणवा पेटला होता, त्यावर पौर्वात्य मेघानें वळून अध्यात्मवादाचें सिंचन केलें, व तो शमविला. कवीनें पाश्चात्त्यांना सृष्टीचें नवें दर्शन करून दिलें. अशा रीतीनें त्यानें केवळ पाश्चिमात्यांनाच उपकृत करून ठेविलें आहे असें नाहीं, तर त्याचे पौर्वात्यांवरही बरेच उपकार आहेत. पाश्चिमात्यांप्रमाणें पौर्वात्यांना—विशेषतः आम्हां हिंदवासीयांना तो ' देवदूत ' च झाला आहे. रवींद्रनाथ हे अध्यात्मवादी कवि आहेत, व ' अध्यात्मवाद तर महाराष्ट्रीयांच्या रोमरोमीं भरला आहे; तेव्हां रवीन्द्रांच्या ' शिशु ' सारख्या स्वभावचित्र काव्याचें महाराष्ट्रास जितकें कौतुक वाटतें, तितकें त्यांच्या ' गीतांजलि ' सारख्या अध्यात्मपर काव्याचें वाटत नाहीं ' हें म्हणणें जरी खरें धरलें, तरी रवीन्द्रांनीं तो ' शिळा वेदान्त ' च आपल्या ओजस्वी वाणीनें व नव्या स्फूर्तीनें गाइला असल्यामुळें त्यास नवीनपणा व जिवंतपणा आला आहे. सोनें एक खरें तरी त्याच्या केलेल्या अनेक वस्तूंस जी निरनिराळी किंमत ठरते, ती केवळ सुवर्णकाराच्या कारागिरीनेंच होय.

अध्यात्मविद्येसंबंधानें पौर्वात्य हिंद राष्ट्रांत अलीकडच्या काळांत जो एक प्रकारचा अनादर पसरत चालला होता त्यासही महाराष्ट्र साधूंप्रमाणें रवीन्द्रानें—अर्वाचीन साधूनें आळा घातला. ' अध्यात्मविद्या विद्यानां ' ही गोष्ट पुन्हा सिद्ध करून दाखविली. आपल्या भावना, आपल्या वृत्ति यांचा निग्रह न करितां उलट सत्कृत्यांत उपयोग व्हावा म्हणून त्यांचा विकास करावयास, ' जे कां रंजले गांजले, त्यांसि म्हणे जो आपुलें '

म्हणावयास, ' आत्मवत्सर्वभूतेषु ' पहावयास शिकविणाऱ्या तत्त्वज्ञानाची आम्हांस जरूरी होती ती त्यानें पुरविली. ' कुरु कर्म त्वं ' हा गीतेंतील प्रवृत्तिपर पाठ स्मृतिशेष होत होता, त्याची या पुरुषानें आम्हांस ओळख करून दिली. ' बाह्य चिन्हें टाकून द्या, अरण्याची वाट धरा ' हा जो पंथ आम्हांत फैलावला होता त्याचा निषेध करून ' लीन व्हा, व आपल्याला ओळखा ' हा दाखविला. निवृत्तिपर बनून आपला देश, आपला धर्म यासंबंधानें उदासीन व्हा, असा कवीनें कधींच उपदेश केला नाहीं.

केवळ या काव्यावरूनच पाहूं जातां ' ईश्वराशीं सलगी व्हावी म्हणून कवि कधीं मुग्ध बालिका बनून त्यास आलिंगन देण्यास आतुर झालेला आहे, तर कधीं त्यास अलंकार व वेष यांचा त्रास येऊन ही आभरणें प्रियकराचें हृदय मलिन होण्यास आड येतील म्हणून तो तीं झुगारून देत आहे. रोमांच उत्पन्न करणारे प्रभुगानाचे आलाप आपल्या शरीरांतील रोमरोमांतून भरून जावेत म्हणून तो त्या प्राणविसाव्यास आपल्या देहाचा मुरलीप्रमाणें उपयोग करण्यास आपल्या काव्यांत विनवीत आहे. आपलें सर्वस्व प्रभुसेवेंत उपयोगांत यावें म्हणून ही देहकलिका पूर्ण उमलण्याच्या अगोदरच खुडून घेण्यास आपल्या गुरूस तो कळकळीनें आळवीत आहे. ' ( उषा ) असें कवीचें चित्र थोडक्यांत रंगवितां येईल. तसेंच त्याच्या उपदेशाचें सार सांगावयाचें झाल्यास लीनता, नीतिशुद्धता, स्वदेशभक्ति व सर्वभूतीं प्रेम या चार शब्दांत तें सामावतां येईल. हा गुणचतुष्टयरूपी हिरा प्रासादिक काव्याच्या कोंदणांत बसविल्यामुळें त्याची योग्यता बरीच चढली आहे, व या हिंदभूमीच्या मूळ अलंकारांस यानें बरीच नवीन शोभा आणली आहे. अशा प्रकारचे अत्युज्वल मणि वरचेवर लाभोत अशी साहाजिक आकांक्षा प्रत्येक हिंदपुत्राच्या मनांत उत्पन्न झाल्यास फारसें नवल नाहीं. " ( ना. म. भिडे—चित्रमयजगत् फेब्रु. १९१५ )

## गीतांजलींतील उतारे

' ही येथें तुझी बैठक आहे, परंतु तूं मात्र तेथें नसून जेथें अत्यंत गरीब, अत्यंत दीन, अत्यंत पातकी राहतात, त्या ठिकाणीं आहेस '

( गी. १० ); ' जेथें शेतकरी उन्हांत व पावसांत आपली बरड व कठोर जमीन नांगरीत आहेत, जेथें मजूर मोठ्या श्रमानें रस्त्याकरितां खडी फोडीत आहेत व जेथें झाडू रस्ते साफसूफ करीत आहेत, तेथें परमेश्वराचें अधिष्ठान आहे ' ( गी. ११ ); ' तुला जर या सुंदर व मौल्यवान् वस्त्रानिशीं त्याजकडे येववत नसेल, तर तीं फेंकून दे, व त्याच्याचप्रमाणें तूंही या धूलीमय प्रदेशांत उभा राहून काम कर; तुझीं वस्त्रें फाटलीं व मळून गेलीं, तर त्यांत कांहीं फारसें बिघडलें नाहीं. त्याला भेट, आणि त्याच्याबरोबर तुझ्या अंगांतून निढळाचा घाम निथळेल इतके कष्ट करीत रहा ' ( गी. ११ ) ' माझ्यापाशीं जो बेगडी कचरा भरला आहे तो बाहेर फेंकून देण्याचें धैर्य मला होत नाहीं, माझीं कर्जें मोठमोठीं आहेत, माझीं कृत्यें फार अघोर, गुप्त व शरम वाटण्यासारखीं आहेत, तथापि माझें चांगलें व्हावें याकरितां जेव्हां मी तुजकडे धांव घेतों, तेव्हां माझी प्रार्थना कदाचित् अमान्य होणार नाहींना ? या भीतीनें मी सांशक होतों, माझें सर्वांग थरथरूं लागतें ' (गी. २८) ' दुःख ही एक जगांतील उत्कृष्ट वस्तु आहे; बाकीच्या वस्तु आपणास परमेश्वराकडून देणगीदाखल मिळालेल्या आहेत; परंतु परमेश्वरास समर्पण करितां येईल अशी आपल्या मालकीची वस्तु जर कोणती असेल तर दुःख होय, ' ( गी. ८३ ) ' पुष्प आपल्या सुगंधानें वायूला सुगंधित करतें, तथापि त्याचा अंतिम हेतु येवढाच कीं, तुला आत्मदान करावें ' ( गी. ७५ ); ज्या वेळीं भक्त गावांतील रस्त्यांतून दारोदार भीक मागत फिरत होता, त्यावेळीं परमेश्वराचा सुवर्णमय रथ स्वप्नाप्रमाणें त्याच्या दृष्टीस पडला. सर्व राजांचा राजा आलेला पहातांच त्याच्या आशा वाढत गेल्या व आपले वाईट दिवस संपले, आतां जिकडे पाहीन तिकडे संपत्ति धुळींत पसरलेली मला होईल, असें त्यास वाटलें. रथ थांबला, परमेश्वर हास्य करीत खालीं उतरला; भक्तास वाटलें सरतेशेवटीं नशिबानें हात दिला. परंतु लागलींच परमेश्वरानें आपला उजवा हात एकाएकीं भक्तापुढें केला आणि म्हणाला, ' मला देण्यास तुजजवळ काय आहे ? ' ' माझ्यासारख्या दरिद्रयापुढें येऊन तुझ्यासारख्या राजाधिराजानें भीक मागण्याकरितां हात पुढें करावा ! या

तुझ्या राजविनोदास नांव तरी काय देऊं ! ' भक्तानें झोळींतून अगदीं बारीक असा दाण्याचा कण काढला, आणि त्यास दिला. पुढें तो कण सोन्याचा झाल्यावर भक्त खळखळून रडला व म्हणाला, केवढा तरी दुर्भाग्य मी कीं, माझें सर्वस्व तुला अर्पण करण्याची बुद्धिच मला झाली नाहीं ! !(गी. ५०);

युवकानें आपल्या प्रियेस गुलाबाची माळ न देतां अग्निज्वालेप्रमाणें चमकणारें व इंद्रवज्राप्रमाणें अभेद्य असें खड्ग दिलें. वास्तविक या खड्गाशीं तिला काय करावयाचें आहे. तथापि तिनें ती दुःखभाररूपी देणगी सदैव वागाविली व सन्मानदायक म्हणून समजली. आतां तिला जगांत कसलीही भीति नाहीं. पाश तोडून टाकण्याकारितां तें प्रियकराचें खड्ग तिच्यापाशीं आहेच ( गी ५२ ); या जगांत जे मजवर प्रेम करणारे आहेत, ते सारे मला बद्ध करण्याचा प्रयत्न करितात. ते मला एकटा म्हणून सोडीत नाहींत. ( गी. ३२ ); एवढेंच नव्हे तर ते म्हणाले तुझ्या देवाच्या पूजेंत आम्ही मदत करूं. पण पाहतों तों ते बंडाळी करूं लागले ( गी. ३३ ); संसाराचे पाश फारच मजबूत आहेत ( गी. ३८ ); त्यामध्यें माझा पराजय टाळणें ही गोष्ट माझ्या शक्तीच्या बाहेरची आहे ' ( गी. ९८ ); ' हे नाथ ! माझीं सुखदुःखें मला सहन करतां येतील अशी शक्ति मला द; क्षुल्लक गोष्टीपासून माझें मन दूर राहील असें सामर्थ्य मला दे. ' तुझ्या मनांतून जर मला बद्धच करावयाचें आहे, तर ' मला बद्ध करून टाकणाऱ्या पाशांपैकीं ज्या पाशानें मी तुझ्या इच्छेशीं बद्ध झालें असेन तेवढाच शिल्लक राहो, ' व माझें सर्वस्व तूं असें ज्या भावनेच्या योगानें मला म्हणतां येईल तेवढीच माझ्यांत शिल्लक राहो. ' ( गी. ३४ ); प्रपंचांचीं कामें मी करीत असतां जेव्हां माझ्या आसपास खूप गोंगाट माजून तुझें दर्शन मला बंद होईल, तेव्हां हे शांतिनाथ ! तूं आपली शांति व विश्रांति यांस घेऊन मजजवळ ये. तुझी प्राप्ति करून घेण्याचा मार्ग फार लांबचा, अत्यंत शीण आणणारा व कंटाळवाणा असेल, आणि तुझी प्राप्ति करून घेण्यास भगीरथ प्रयत्न पडत असतील; परंतु ती माझी भीति निराधार ठरली. ( गी. ४८ ); तूं मला आपल्या दरवाजाबाहेर एकटा वाट पहात

तिष्ठत उभा ठेवतोस तें कां बरें ? खरोखर मी येईन असें तूं मला वचन दिलें आहेस, म्हणून तुझ्या पूजेकरितां मीं ही पूजासामग्री मांडून ठेविली आहे. परंतु वेळ तर निघून गेला म्हणून मजकडे पाहून जेव्हां माणसें हसूं लागतात, तेव्हां मला लाज वाटते. व एखाद्या भिकारणीप्रमाणें मी आपल्या तोंडावर बुरखा घेऊन बसतों ( गी. ४१ ); ' या जन्मांत तुझें दर्शन, तुझी भेट होणें जर माझ्या भाग्यांतच नसेल, तर तुझ्या दर्शनास, तुझ्या भेटीच्या लाभास मी मुकलों, ही जाणीव माझ्यांत निरंतर राहो; क्षणभरही या गोष्टीचा विसर न पडो. या इहलोकच्या बाजारांत जों जों माझें आयुष्य जाईल, द्रव्यानें जों जों माझ्या मुठी भरून जातील, तो तों अरेरे ! मीं कांहींच प्राप्त करून घेतलें नाहीं, असें मला निरंतर वाटत राहो. ' ( गी. ७९ )

' मी अखंड गीतें गाऊन तुझ्या कथा वर्णन करितों. त्यायोगानें माझें गुह्य हृदयांतून बाहेर पडतें. कोणास ठाऊक माझ्या गीतांचा अर्थ काय आहे तो ? ' ( गी.१०२) ' हें माझें कविहृदय द्रवून जाऊन त्यांतून काव्यरूपाचा जो प्रवाह पडतो, तो तरी या विश्वव्यापी दुःखामुळेंच ' (गी. ८४). ' माझ्या गीतानें आपले सर्व अलंकार काढून ठेविले आहेत. सुंदर पोषाख अथवा भूषणें त्यावर नाहींत. भूषणांच्या योगानें आपलें तादात्म्य बिघडेल. तीं तुझ्यांत व माझ्यांत आड येतील, व त्यांचा ध्वनि तुझ्या मंद मधुर ध्वनीला बुडवून टाकील. ' ' समुद्राच्या स्वच्छंद लाटांप्रमाणें माझीं गाणीं स्वच्छंद आहेत, त्यांना शब्दाचें बंधन नाहीं. ' ' मी इतउत्तर उगीच शब्दावडंबर माजवीत राहूं नये, अशी माझ्या मालकाची इच्छा आहे. माझ्या हृदयाची वाणी आतां केवळ गाणीं गाण्याच्या स्वरूपानें व्यक्त होईल. अनंताच्या सुराशीं मी आपला सूर लावणार. ' ( गी. १०० ). ' परमेश्वराकडे जाण्याचें मार्ग फार कठीण अडचणीचे व लांबचे आहेत. सोपा असा एकच मार्ग आहे. तो मार्ग म्हटला म्हणजे मधुर व प्रेमळ गायनाचा. ' माझ्या आयुष्यभर मीं तुझी प्राप्ति करून घेतली. त्यांनींच मला एका भूमिकेंतून दुसऱ्या भूमिकेंत नेलें त्यांच्याच योगानें मीं अंतर्मुख होऊन स्वतःचें पर्यालोचन केलें. शेवटीं रहस्यें उलगडलीं त्यांनींच ! । ( गी. १०१ ):

‘ माझें जीवितसर्वस्व—आजपर्यंत जें जें मिळविलें तें तें सर्व मी आपल्या पाहुण्यांस अर्पण करीन. त्याला रिक्तहस्तानें कधींहि जाऊं देणार नाहीं ’ ( गी. ९० ); ‘ या लोकीं असतां माझें प्रेम जसें माझ्या प्राणावर आहे, तसेंच मृत्यूवरही माझें प्रेम राहील ’ ( गी. ९५ ); ज्या ठिकाणीं ज्ञानप्राप्तीचे मार्ग मोकळे आहेत, ज्या ठिकाणीं संकुचितपणामुळें जनतेचे तुकडे झाले नाहींत, जेथें शुद्ध सत्याशिवाय शब्दच बाहेर पडत नाहींत, ज्या ठिकाणीं पूर्णता प्राप्त करून घेण्यासाठीं उद्योग सतत व अविश्रांत आपापले हात पसरीत आहे, जेथील प्रज्ञेचा निर्मळ झरा रूढीच्या वाळूंत लुप्त होऊन गेला नाहीं, जेथील विचार व आचार विस्तृत होऊन मन प्रगति पावत आहे अशा त्या स्वतंत्रतेच्या स्वर्गभूमींत हे तात माझा देश जागृत होवो ! ’ ( गी. ३५ ).

कवि दे. ल. महाजन यांच्या महाराष्ट्र-गीतांजलींतून पुढील उतारे घेतले आहेत:—

“ हे परमात्मन् ! जेथें न शिवे भीति मनाला कांहीं,
डोळे करुनी वर चालाया शंका वाटत नाहीं,
जेथें असती मार्ग मोकळे ज्ञानाच्या प्राप्तीचे,
संकोचानें तुकडे तुकडे झाले नच जनतेचे.
शुद्ध अशा त्या सत्यावांचुनि शब्द न जेथें वायां,
हात पसरितो उद्यम संतत पूर्णतेस मिळवाया.
मृत रुढीच्या भयाण पुलिनीं पावुनिया लोपाला,
प्रज्ञेचा तो निर्झर निर्मल लुप्तप्राय न झाला.
कृपाप्रेरणा तुझीच कारण ज्या आचारविचारां,
होउनि तद्विस्तार, मनाच्या प्रगतिस मिळतो थारा.
प्रभो ! अशा त्या स्वतंत्रतेच्या स्वर्भूमाजीं ताता !
होवो माझा देश निरंतर जागृत सत्वर आतां. (गी. ३५)

* * *

“ जुन्या भूमिकेंतुनि मज नेती नव्या भूमिकेमाजीं
त्वत्प्राप्तिस्तव अशीं गायिलीं सदैव गीतें जीं जीं
त्यांच्या साह्यें जेव्हां केला शोध आत्मतत्वाचा
अंतर्मुख मी होऊनि बघतां स्पर्शहि झाला त्याचा.
जें जें कांहीं शिकलों तें त्या गीतांनींच शिकविलें
जितुके कांहीं गूढ मार्ग ते त्यांनीं मज दाखविलें,
हृदयाकाश–क्षितिजावरि जे चमकत असती तारे
त्या गीतांनीं पहा आणिले दृष्टीसमोर सारे
सुखदु:खांच्या प्रदेशांतलीं गूढ रहस्यें जीं जीं
त्यांनीं तीं उकलूनि दाविलीं सर्वहि दिवसांमाजीं
प्रवास माझा संपत येतां या संध्यासमयास
मला आणिलें वरें कोणच्या राजमहाद्वारास ? (गी. १०१)

*　　*　　*

“ हे प्रिय भगवान् ! मदिंद्रियें हीं पावुनि पूर्ण विकास,
तव चरणांचा स्पर्शहि होवो ! इहलोकांतच त्यांस.
आषाढीं घन लोंबे घेऊनि जलधारांचें ओझें,
तव दारासी नम्र तसें हें चित्र असूं दे माझें.
भिन्न स्वर ते एकच करुनी सर्वहि गीतें माझीं,
मिळोत एका प्रवाहेंच तीं शांति-समुद्रामाजीं,
वास जयांचा हिमाचलाच्या मानस–सरोवरांत,
जाया नीडाकडे मनीं जे उत्कंठित अत्यंत,
राजहंस ते असे ज्यापरी जाती नित्य उडून.
शाश्वत सद्माकडेच राहो ! जीव तसा लागून,
या गोष्टी सर्वहि घडाव्या देवा ! सत्यपणानें.
नम्रपणानें तुज केलेल्या एका प्रणिपातानें. ” (गी. १०३)

---

# प्रकरण पांचवें

## विश्वभारती

बंगाल्यांत बोलपूरपासून दोन मैलांवर एका साधारणशा उंच टेकडीवर गर्द झाडांची राई आहे. तेथील वनश्री, नयनमनोहर सृष्टीचीं दृश्यें व गंभीर शांतता यायोगें रवींद्रनाथांचे वडील महर्षि देवेंद्रनाथ यांचें मन त्या वनस्थलीनें आकर्षून घेतलें व ध्यानधारणेसाठीं त्यांनीं ती जागा पसंत केली. तेथें त्यांनीं व रविबाबूंनीं आश्रम बांधला व त्याला व्यवस्थित पण आकर्षक स्वरूप दिलें. हा आश्रम म्हणजे रविबाबूंच्या ध्येयसृष्टीचें बीजारोपणच होय. देशाची दुरवस्था पाहून राष्ट्राच्या शाश्वत कल्याणासाठीं आपण कांहीं तरी केलें पाहिजे ही गोष्ट कित्येक दिवस त्यांच्या अंतःकरणांत तीव्रतेनें घोळत होती. त्यांच्या राजकीय कार्यांतूनच त्यांच्या हृदयांत शिक्षणाचा कार्यक्रम हातीं घेण्याची स्फूर्ति झाली. ' देशाची सामाजिक सांस्कृतिक व अध्यात्मिक उन्नती कशी होईल अशी चिंता माझ्या हृदयांत अहर्निश ठाणें देऊन बसत असे. दरिद्रीनारायणाचा उद्धार कसा होईल या चिंतेंत मला कांहीं सुचेनासें होई व माझ्या हातून कांहींच होत नसे. अशा अवस्थेंत विश्वभारतीची कल्पना माझ्या मनांत संचरली व तिला स्वरूप देण्याच्या इच्छेनें मी हा आश्रम स्थापन केला. ' असे त्यांनीं एके ठिकाणीं उद्गार काढले आहेत. ह्याप्रमाणें त्यांनीं १९०१ सालीं शांतिनिकेतन आश्रमांत विश्वभारती ह्या विश्वविद्यालयाची संस्थापना केली. विश्वभारती विद्यापीठांतील शिक्षणासंबंधींची माहिती त्यांनीं एका लेखांत स्वतंत्रपणें दिली असल्यामुळें तो लेख खालीं दिला आहेः—

## माझ्या शिक्षणसंस्थेचें ध्येय

"मी स्वतः कलेचा उपासक असल्यामुळें माझी शिक्षणसंस्था कला-संवर्धनाच्या तत्त्वावरच स्थापन झाली असल्यास नवल वाटण्याचें कारण नाहीं. मी स्वतः शास्त्रज्ञ नसल्यामुळें माझ्या शिक्षणसंस्थेला अध्यापनाच्या प्रयोगशाळेचें स्वरूप आलें नाहीं. गेलीं तीस वर्षे माझ्या कार्याचा जरी

व्याप वाढत चालला आहे तरी वरील कारणामुळें माझी कल्पना जनतेपुढें मांडणें दुष्कर झालें आहे. ह्या मुदतींत माझ्या शिक्षणासंबंधींच्या अनेक कल्पनांना मूर्तस्वरूप आलें आणि मी आपल्या ध्येयमंदिराजवळ जाऊन पोहोंचलों.

लहान मुलांचीं मनें इतकीं हळुवार व ग्राहकशील असतात कीं त्यांच्यावर त्यांच्या सभोंवतालच्या जगाचा परिणाम होण्यास यत्किंचितही वेळ लागत नाहीं. त्यांना अशी उपजत ग्राहकशक्ति असल्यामुळें त्यांना भाषा शिकावयास मुळींच आयास पडत नाहींत. निःसंदिग्ध रीतीनें मनोविकार व विचार प्रदर्शित करण्याच्या दृष्टीनें भाषा हें सुलभ साधन नाहीं. तथापि स्वाभाविक कल्पनाशक्तीमुळें मुलें आपोआप भाषा शिकूं लागतात. कित्येक शब्दांचे अर्थ आपल्याला त्यांना समजावून देतां येत नाहींत, तरी देखील योग्य अर्थ कोणता ते तो तेव्हांच उमगतात.

परंतु मुलांना अशा कोंवळ्या वयांत रुक्ष, निर्जीव व निरुत्साह उत्पन्न करणाऱ्या शाळेच्या कोंडवाड्यांत पाठविण्यांत येतें. ह्या शाळा म्हणजे पांढऱ्या स्वच्छ भिंती असलेल्या मशिदीच होत. मुलाला शाळेंत घालणें म्हणजे मुलाचा जगाशीं असलेला संबंध तोडणें यापलीकडे दुसरा अर्थ नाहीं. लहान मुलांना सक्तीनें शिक्षण देण्याचा प्रयत्न करणें म्हणजे सुंदर फुलांवर गारांची वृष्टि करण्याचा एक प्रकार असें म्हणण्यास हरकत नाहीं.

ज्या निसर्गसिद्ध गोष्टींपासून मुलांना आपोआप शिक्षण मिळूं शकते अशा गोष्टी मुलांच्या भोंवतीं नेहमीं ठेवण्यांत याव्यात. दररोजच्या जीवनक्रमांतली प्रत्येक गोष्ट त्यांच्या अवलोकनांत आली पाहिजे आणि त्यांचें मन आश्चर्यभरित झालें पाहिजे. अशी क्रिया चालूं राहिली म्हणजे नाविन्याकडे त्यांचें लक्ष वेधून त्यांची जिज्ञासाशक्ति जागृत होईल.

प्रौढांच्या मनात अनेक विषयांची गर्दी उसळत असल्यामुळें नैसर्गिक चमत्कारांकडे त्यांचें लक्ष वेधत नाहीं. ज्या गोष्टी उपयुक्त आहेत तेवढ्याच घेण्याकडे त्यांचें लक्ष असतें. मुलांच्या अंतःकरणांत असा भेदाभेद नसतो. जी जी नवी गोष्ट त्यांच्या डोळ्यापुढें येते तिचा एकाच समबुद्धीनें स्वीकार केला जातो. त्यांच्या अशा सर्वव्यापी सर्वग्राहक

बुद्धीमुळें त्यांना थोडक्यांच वेळांत अनेक गोष्टी शिकतां येतात. प्रौढांची ग्राहकशक्ति तितकी तीव्र नसते. मुलाला कोंवळ्या वयांत जें हें शिक्षण मिळतें तें अतिशय महत्त्वाचें व मौल्यवान असतें.

मी लहान असतांना मला ह्या शाळेच्या चक्राचा अनुभव आला आहे. शाळेंत शिक्षण देण्याची पद्धत अत्यंत निष्ठुरपणाची आहे. ही पद्धत पाहून मी तर असा निश्चय केला कीं ज्या शाळेंत मुलांना पूर्ण स्वतंत्रता देऊन शिक्षण देतां येईल अशी शाळा काढावी.

मी बारा वर्षांचा असतांना माझ्या सक्तीच्या इंग्रजी शिक्षणास प्रारंभ झाला. कित्येक इंग्रज व अमेरिकन लोकांना माहीत नसेल कीं त्यांची भाषा अत्यंत निर्दय व नियमबाह्य आहे. भाषेची अक्षररचना ( Spelling ) किंवा भाषेचे वाक्प्रचार हे कोणत्याही नियमाला धरून नाहींत. पण त्याचें प्रायश्चित्त मला भोगावें लागलें.

दररोज संध्याकाळीं आमचे इंग्रजीचे मास्तर येत असत व ते आले म्हणजे मोठ्या नाखुषीनें व मनांतल्या मनांत चडफडत कां होईना मला त्यांच्यापुढें बसणें भाग पडे. संगीनी घेतलेल्या शिपायांची रांग जशी उभी रहावी त्याप्रमाणें पुस्तकांतील इंग्रजी अक्षरें मला दिसत असत.

त्या मास्तरचा मला इतका राग येत असे पण तो कांहीं एक दिवस सुद्धां येण्यास चुकत नसे. तो कधीं आजारी पडला नाहीं कीं त्याच्या घरीं कोणीं मृत्यूही पावलें नाहीं. तो इतका वक्तशीर होता म्हणूनच मला त्याचा संताप येत असे. मला आठवत आहे, कीं संध्याकाळीं गच्चीवर उभा राहून मी आजूबाजूची शोभा पहाण्यांत गुंग असलों कीं नेमकें त्यावेळीं माझे मास्तर यावयाचे आणि माझ्या अंतःकरणांत दहशत उत्पन्न करावयाचे.

विद्यार्थ्यांना कसें शिकवावें हें शिक्षकांना कळत नसल्यामुळें ते मुलांना बेदम मारीत सुटतात. लहान मुलांचें मन कसें असतें याची त्यांना जाणीव नसल्यामुळें त्यांच्या निष्ठुरपणाला बंधन रहात नाहीं. असल्या कर्दनकाळ मास्तरांच्यापुढें विद्यार्थ्यांनीं शिकावयाचें नाकारलें तर तो

त्यांचा दोष नाहीं. ह्याच प्रकारच्या कडक शिस्तींत मला वयाच्या तेरा वर्षेपर्यंत रखडावें लागलें.

तेरा वर्षांचा असतांना मी शाळा सोडली आणि माझ्या वडिलांनीं व इतर मंडळींनीं जरी मला धाक घातला तरी मी आपला हट्ट सोडला नाहीं.

तेव्हांपासून माझें शिक्षण घरींच चालू झालें आणि आज मी जें ज्ञान संपादन केलें आहे तें शाळेंत न जातां संपादन केलें आहे. अगदीं लहान असतांना मी शाळामास्तरच्या तावडींतून सुटलों ह्या गोष्टीबद्दल मला फार आनंद वाटतो. व मी आपल्याला भाग्यवान समजतों. **माझ्या आयुष्यांत जें कार्य झालें आहे, व माझ्या हातून जें जें निर्माण झालें आहे, त्या सर्वांचें श्रेय माझ्या शाळेंत न जाण्याकडे आहे.** मी शाळेंत गेलों नाहीं आणि शिक्षकांच्या कडक शिस्तीखालीं राहिलों नाहीं ही गोष्ट माझ्या आयुष्याला नवीन व इष्ट वळण लावण्यास कारणीभूत झाली यांत शंका नाहीं.

आणि मग माझ्या काव्यमय जीवनाला सुरवात झाली. गंगानदीच्या तीरावर तासच्या तास एकांतांत बसावें, किंवा स्वतंत्र नाव घेऊन दूर वल्हवीत वल्हवीत जावें, कविता कराव्या, गोष्टी लिहाव्या, नाटकें रचावीं व स्वप्नसृष्टींत संचार करावा असा माझा काव्यरम्य कार्यक्रम सुरू झाला

हळू हळू मी लोकांना माहीत होऊं लागलों व माझें नांव सर्वत्र प्रसिद्ध होऊं लागलें. मला बाहेरच्या प्रांतांतून आमंत्रणें येऊं लागलीं; पण कित्येक वर्षें मी एकांतवासांतच आपलें आयुष्य व्यतीत केलें. वाङ्मयिक जीवनाच्या कक्षेंत एकान्तवासांत मी आपलें जीवन घालवीत असतांना लोकांना मी कसा ठाऊक झालों आणि ते मला कसें व कां बोलावूं लागले या गोष्टी मला अद्याप माहीत नाहींत.

आणि विशेष आश्चर्याची गोष्ट ही कीं ज्या गोष्टीचा माझ्या जन्मांत मला मुळींच अनुभव नाहीं, अशी शिक्षणसंस्था काढण्यास मी प्रवृत्त

झालों. हें जरी एकप्रकारें धाडसच होतें, तरी माझा आत्मविश्वास कमी बलवत्तर नव्हता. मुलांच्याबद्दल माझ्या अंतःकरणांत विशेष प्रेम होतें ही गोष्ट मला माहींत होतीच, आणि मुलांची मनोधारणा माझ्या चांगलीच परिचयाची असल्यामुळें माझी पूर्वतयारी झाली होती असें म्हणण्यास हरकत नाहीं. इतर शिक्षकांपेक्षां मी त्यांना उच्च प्रकारचें शिक्षण देऊन विद्यासंपन्न करीन असा माझा दृढ विश्वास होता.

शाळा, शाळेचे वर्ग, मास्तर आणि माझा लहानपणाचा अनुभव ध्यानांत घेऊन निसर्गशिक्षणाची शाळा कशी काढावी हें मी निश्चित केलें आणि एक सुंदर, निसर्गरम्य जागा घेऊन वस्तीपासून दूर अशा शांत ठिकाणीं नवीन शाळा स्थापन केली. ही शाळा झाडाखालीं भरत असे व विद्यार्थ्यांना हवी तेवढी स्वतंत्रता असे.

आजूबाजूच्या वनश्रीपासून व रम्य वातावरणापासून विद्यार्थ्यांना आपोआपच पुष्कळ ज्ञान मिळत असतें. त्याप्रमाणें मी प्रारंभींच व्यवस्था केली. निरानिराळ्या रंगांचीं मनोहर फुलें, व फळें, सकाळसंध्याकाळचीं मनोरम दृश्यें, आकाश व तारका यांचें नयनाल्हादक देखावे, शुभ्र चांदणें, निरनिराळे ऋतु, वगैरे गोष्टींपासून मुलांना साहजिकच आनंद होत असतो व त्यांचें कुतूहल जागृत होत असतें. निसर्गाच्या निरनिराळ्या दृश्यांवर मुलांच्याकरितां मी अनेक कविता रचल्या. निसर्गाची हांक इतकी गोड असते कीं त्या हांकेबरोबर माणसाला धांवत जाण्याची इच्छा झाल्याशिवाय रहात नाहीं. आमच्या सुट्या निसर्गाच्या इच्छेवर अवलंबून असतात. आकाशांत ढग भरून आले आणि विजा चमकावयाला लागल्या म्हणजे आम्ही पुस्तकें बंद करतों व निघून जातों. पशुपक्षी, झाडें, वनस्पति व लता यांच्यापासून दूर पळणें हा शुद्ध रानटीपणा आहे. माझ्या शिक्षणसंस्थेंत कोणालाही मनाई नाहीं.

जनसंमर्दापासून दूर अशा शांत ठिकाणीं मी एक जागा घेतली. माझें रहाणें कलकत्त्यासारख्या गजबजलेल्या शहरांत झाल्यामुळें मी शहराला अगदीं कंटाळलों होतों. व कोठें तरी शांत व एकान्त ठिकाणीं जाऊन

रहावें अशी इच्छा जागृत झाली. निसर्गसौंदर्यसंपन्न वसतिस्थान पसंत करून मी आपल्या शिक्षणकार्याचा ओनामा केला. आरंभीं थोडीं मुलें होतीं. तीं माझ्या सभोंवतीं बसत व मी त्यांना शिकवी. त्यांचा मित्र, त्यांचा सोबती या नात्यानें मी त्यांच्याशीं वागे. त्यांच्यासाठीं मी कांहीं गाणीं रचलीं होतीं. कांहीं नाट्यछटा व नाट्यप्रसंग लिहिले होते. मुलें तीं गाणीं म्हणत आणि नाट्यप्रसंग करून दाखवित. मी रामायण—महाभारतासारखी पौराणिक काव्यें त्यांच्यापुढें म्हणून दाखवित असे व त्यांना त्यांतलि गोष्टी सांगत असे. आमच्या शिक्षणक्रमाचा हा श्रीगणेशा होता. प्रारंभीं माझ्या शाळेंत पांच किंवा सहा मुलें होतीं.

लोकांचा माझ्यासारख्या कल्पनासाम्राज्यांत विहार करणाऱ्या कवीवर विश्वास नसल्यामुळें आणि माझ्या शिक्षणपद्धतीविषयीं त्यांच्या मनांत संशयात्मता वास करीत असल्यामुळें माझ्या संस्थेंत आपलीं मुलें पाठविण्यास त्यांची तयारी नसे. आणि म्हणून प्रारंभीं थोडीं मुलें घेऊन मला शिक्षणकार्याला सुरवात करावी लागली.

**शिक्षण हा आपल्या व्यावहारिक जीवनाचा एक भाग आहे आणि तो त्यापासून विभक्त करतां येत नाहीं, अशी माझी पहिल्यापासून भूमिका: आहे.** आणि म्हणून जेव्हां तीं लहान मुलें माझ्या भोंवती जमलीं तेव्हां मी त्यांना सर्व प्रकारचे अनुभव घेण्यास पूर्ण स्वतंत्रता दिली. मला त्यांना जितकी स्वतंत्रता देणें शक्य होतें तितकी स्वतंत्रता देऊन त्यांच्या इच्छेप्रमाणें वाटेल तें करण्यास व वाटेल तसें वागण्यास पूर्ण मोकळीक ठेवली होती. त्यांचें ज्या गोष्टींत मन रमेल, त्यांना ज्या गोष्टींत गोडी वाटेल अशाच गोष्टी मी त्यांच्यापुढें मांडीत असे. निरनिराळीं नैसर्गिक दृश्यें दाखवून, खेड्यांतले रमणीय देखावे त्यांच्यापुढें ठेवून किंवा अभिनय करून मी त्यांचें स्वाभाविक कुतूहल जागृत करीत असे.

संध्याकाळीं गाण्याचा तास असे. त्यावेळीं मी मुलांना गाणीं म्हणून दाखवी आणि मुलेंही गाणीं म्हणत. ज्यांना प्रथम गाण्याची गोडी

नव्हती त्यांनासुद्धां ती उत्पन्न झाली आणि तींहि आमच्यांत सामील होऊन गाणीं म्हणूं लागलीं; मुलांच्या उपजत कुतूहलबुद्धीमुळें हें साध्य झालें.

थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे **माझी संस्था पूर्वकालीन ऋषींच्या गुरुकुलाप्रमाणें होती.** विद्यार्थ्यांनीं गुरुगृहीं रहावयाचें आणि गुरूंनीं कांहीं वेतन न घेतां त्यांना विद्यापारंगत करावयाचे. मी हीच पद्धत तंतोतंत अमलांत आणली. विद्यार्थ्यांकडून मुळींसुद्धां फी न घेतां मी त्यांची रहाण्याची, खाण्यापिण्याची व शिक्षणाची सोय केली होती. हें सर्व माझ्या स्वतःच्या खर्चानें चाललें होतें. पण हळुहळू जसजसा माझ्या संस्थेचा पसारा वाढूं लागला, अधिकाधिक विद्यार्थी येऊं लागले आणि त्यांच्यासाठीं नवीन अध्यापक ठेवणें जरूर पडूं लागले तसतसा माझा खर्चही अमर्याद वाढूं लागला. बदललेल्या परिस्थितीप्रमाणें मलाही आपली पूर्वीची कल्पना बदलावी लागली.

इतका खर्च भागवावयाला माझ्याजवळ पैसा नसल्यामुळें विद्यार्थ्यांकडून मला फी घेणें भाग पडलें आणि हळुहळूं माझी शाळा इतर शाळांप्रमाणेंच स्वरूप धारण करूं लागली.

बाहेरून जरी तसा भास झाला तरी माझ्या संस्थेचें वैशिष्ट्य कायमच होतें. शिक्षक व विद्यार्थी एकमेकांशीं मिळून मिसळून वागत. इतकें कीं एकाद्याला वाटावें हें एकत्र कुटुंबच आहे! खेळाच्या प्रसंगीं, उत्सवाच्या वेळीं किंवा इतर कोणत्याहि आनंदोत्सवाचे प्रसंगीं ते एकत्र जमून आनंद अनुभवीत. पिंजऱ्यांत कोंडलेल्या पक्ष्यांप्रमाणें त्यांची अवस्था नव्हती. त्यांना पूर्ण स्वातंत्र्य होतें. त्यांचें भावी जीवन सर्वांगपरिपूर्ण करण्यासाठीं चाहील तें करण्याची त्यांना पूर्ण मुभा देण्यांत आली होती.

मला प्रारंभीं शिक्षकांच्याबरोबर झगडा करण्याचा प्रसंग आला. त्यांचीं ठराविक मतें माझ्या मतांशीं जुळत ना. विद्यार्थ्यांना जेव्हां जेव्हां निष्कारण शिक्षा केली जाते असे त्यावेळीं मी शिक्षकांना दोष देई.

कारण शिक्षकांच्याच चुकीबद्दल कित्येकदां विद्यार्थ्यांना शासन होत असे. मी विद्यार्थ्यांची बाजू घेऊन शिक्षकांवर दोषारोप करूं लागलों कीं शिक्षक माझ्यावर खवळत असत. मला आठवतें आहे कीं एक दिवस विद्यार्थी बेशिस्तपणें वागत आहेत अशी तक्रार घेऊन एक शिक्षक माझ्याकडे आला. वास्तविक कांहीं मुलें त्यावेळीं झाडावर चढून तेथें अभ्यास करीत होतीं. त्याला वाटलें हा शिस्तीचा भंग झाला. मी विद्यार्थ्यांची बाजू घेऊन त्याला सांगितलें कीं विद्यार्थ्यांना कळूं लागलें म्हणजे तीं आपोआपच शिस्तीनें वागूं लागतील. त्यांना असें शिस्तीच्या धारेवर धरणें हा अन्याय आहे. मुलें मोठीं झाली म्हणजे त्यांना झाडावर चढून अभ्यास करण्याचा हक्क मिळणार नाहीं, किंवा अशी सुवर्णसंधीही प्राप्त होणार नाहीं.

मला जें वातावरण हवें होतें तें निर्माण झालें, तें वातावरण आतां टिकणार, त्याबद्दल शंका नाहीं. मुलांची संख्या मात्र एकसारखी वाढूं लागली.

मुलांबरोबर मुलींची संख्याही वाढूं लागली. मुलांमुलींचें एकत्र शिक्षण देण्याची पद्धत हिंदुस्थानांत तरी नवीन आहे. पण ती कांहीं वाईट नाहीं. आमच्या शिक्षणसंस्थेंत त्यांची वागण्याची पद्धत फारच चांगली आहे. मुलें एकमेकांत जशीं वागतात तशींच तीं मुलींतही वागतात. तीं कोण-ताही भेदभाव ठेवीत नाहींत. हेंहि एकप्रकारचें शिक्षणच आहे, ही गोष्ट विसरतां कामा नये.

**युरोप, चीन, जपान** वगैरे देशांतून जे लोक आमच्या संस्थेला भेट द्यावयास व राहावयास येतात, त्यांच्याबरोबर माझ्या शाळेंतील मुलें मोठ्या सलोख्यानें व सौजन्यानें वागतात. हा परक्या देशाचा आहे आणि हा परक्या जातीचा आहे अशी कोणतीहि क्षुद्र भावना ते मनांत बाळगीत नाहींत. ही वृत्ति पहिल्यापासूनच त्यांना शिकविल्यामुळें त्यांना मोकळेपणानें वागतां आलें. इतरत्र राष्ट्रीयत्वाच्या नांवाखालीं मुलांच्या मनांत आकुंचित भावनांचें बीजारोपण केलें जात असल्यामुळें

परकीयांच्याबद्दल त्यांच्या मनांत सहानुभूति उत्पन्न होत नाहीं. ही सहानुभूति उत्पन्न करणें हें माझ्या शाळेचें एक कार्य आहे.

आमच्या शिक्षणसंस्थेसभोंवतीं कित्येक खेडीं आहेत. त्या खेड्यांतील मागासलेल्या लोकांसाठीं आम्ही रात्रींच्या शाळा काढल्या आहेत. आमच्या शाळेंतले विद्यार्थी त्यांना शिकविण्यास जातात. खेडेगांवांतील लोकांत मिळूनमिसळून वागण्याची संवय लागल्यामुळें विद्यार्थ्यांना खेडेगांवच्या यथार्थ परिस्थितीचें ज्ञान होतें हें ज्ञान त्यांना ग्रामसंघटना करण्याच्या वेळीं उपयोगीं पडतें. **विद्यार्थ्यांचें जीवन सर्वांगपरिपूर्ण करण्याकडें माझें विशेष लक्ष असल्यामुळें विद्यार्थ्यांना कोणतीहि जीवनकक्षा अज्ञात रहाता कामा नये, याकडे माझा विशेष कटाक्ष आहे.**

माझ्या संस्थेंत एक मोठी उणीव होती. विद्यार्थ्यांना भौतिकशास्त्र व रसायनशास्त्र शिकविण्याची सोय झाली नाहीं. संस्थेजवळ पुरेसें द्रव्यबळ नसल्यामुळें तेवढी अडचण सहन करणें भाग पडलें. ही गैरसोय ह्यापुढें दूर होऊन संस्था सर्वांगपरिपूर्ण होईल अशी आशा आहे.

ग्रामसुधारणा आणि साक्षरताप्रसार हें आमच्या संस्थेचें मुख्य कार्यक्षेत्र असल्यामुळें आमच्या विद्यार्थ्यांना नेहमींनेहमीं खेड्यांत जाऊन तेथें कार्य करणें आवश्यक असे. **खेड्यांचें संजीवन केल्याशिवाय आपली प्रगति होणें शक्य नाहीं.** आधुनिक सुधारणा खेड्यांतील स्वाभाविक जीवन नष्ट करीत आहेत, आणि खेड्यांतून जो काय उत्कृष्ट अंश शिल्लक उरला आहे तो शहरांत लुटून नेण्याची तयारी करीत आहेत. तेव्हां अशा परिस्थितींत ग्रामसंघटनेचें व ग्रामसुधारणेचें महत्वाचें कार्य हातीं घेणें मला आवश्यक वाटलें व विद्यार्थ्यांना मीं त्याप्रमाणें शिक्षणही देण्यास प्रारंभ केला.

मी उत्तमोत्तम चित्रकारांना आमच्या शाळेंत रहाण्यास बोलाविलें व त्यांना वाटेल तीं चित्रें काढण्यास परवानगी दिली. चित्रकार हीं चित्रें रेखाटीत असतांना मुलांची इच्छा त्यांच्याजवळ बसण्याची असल्यास

मुलांना पूर्ण मुभा देण्यांत आली. मुलांच्या नजरेस चित्रकला यावी एवढ्या हेतूनेंच चित्रकारांना निमंत्रण देण्यांत आलें होतें. माझीहि अशीच पद्धत असते. मी ज्या वेळीं काव्य लिहितों त्या वेळीं माझ्या-भोंवतीं शिक्षक असतात व मी ज्या कविता म्हणतों त्या ते ऐकतात. विद्यार्थ्यांचाहि घोळका जमतो. मुलांची कलाविषयक बुद्धि जागृत करण्यासाठीं हा उपक्रम करण्यांत आला आहे. चित्रकार चित्रें रेखाटूं लागला, म्हणजे तीं त्याच्याभोंवतीं उड्या मारीत येतात व मोठ्या कुतूहलानें निरीक्षण करीत बसतात.

आपल्या शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या आणि गोरगरिबांच्या उपयोगीं पडून त्यांना मदत करीत जा, असें आम्ही प्रारंभापासूनच लहान मुलांच्या मनांवर बिंबवीत असतों. ग्रामसंघटनेचें कार्य अशाच उपायांनीं फलद्रूप होईल. आमच्या शाळेसभोंवतीं अनेक खेडेगांवें असल्यामुळें मुलांना त्यांच्या सान्निध्याचा निसर्गाप्रमाणें उपयोग करून घेतां येतो.

आमच्या संस्थेशेजारीं केवळ खेड्यांतील लोकांसाठीं आम्हीं एक स्वतंत्र शाळा काढली आहे. वरच्या लोकांसाठीं निराळी आणि अशिक्षित गांवढळांसाठीं निराळी अशा दोन शाळा काढण्याचा एवढाच उद्देश कीं आमच्या संस्थेंत जीं मुलें येतात तीं बहुधा मध्यम व श्रीमंत कुटुंबांतून येतात. त्यांना परीक्षा पास होऊन व पदव्या मिळवून चरितार्थ चालविण्याची खटपट करावी लागते. अशा स्थितींत त्यांना आदर्श शिक्षण देणें शक्य होत नाहीं. गायन, वादन, चित्रकला इत्यादि कलाविषयक अभ्यासाकडे त्यांचा कल नसतो. कारण त्यांच्या दृष्टीनें ह्या अभ्यासांत त्यांचा वेळ फुकट जात असतो. केवळ परीक्षा पास होणें हेंच त्यांचें ध्येय असल्यामुळें त्यांचें शिक्षण पदवी मिळण्यापलीकडे नसतें. मोठ्या नाईलाजानें मला ह्या परिस्थितीपुढें मान वाकवावी लागत आहे. कारण तसें मी न करीन तर माझ्या संस्थेंत एकही विद्यार्थी पाऊल टाकणार नाहीं. ह्या परिस्थितीचें असें एक कारण आहे कीं आपला देश दरिद्री असल्यामुळें त्याला कांहीं तरी पोटाचा धंदा केल्याशिवाय गत्यं-

-तर उरलें नाहीं. आणि हा धंदा मिळवावयाला परीक्षा पास झाल्या-खेरीज दुसरी गती नसते. तेंव्हां शेतकरी व कामकरी यांच्यांसाठीं मला स्वतंत्र शाळा काढणें भाग पडलें. सरकारी नोकरी मिळविण्याची त्यांची धडपड नसल्यामुळें किंवा त्यांना पदवींतच पुरुषार्थ वाटत नसल्यामुळें त्यांना ती शाळा फार उपयुक्त वाटते. सर्वांगपरिपूर्ण शिक्षण देण्यासंबंधीचे माझे प्रारंभींचे जे उद्देश होते ते मी ह्या शाळेंत अमलांत आणण्याचा प्रयत्न करीत आहे. मला अशी आशा आहे कीं थोड्याच काळांत माझी ही नवीन शाळा आदर्श शिक्षणसंस्था होईल आणि दुसरीकडे कोणी लक्षही देणार नाहीं.

मुलांच्या मनोवृत्तीला कोठलेंहि कसलेंहि बंधन नसल्यामुळें तीं स्वतंत्र वातावरणांत विहार करतात. ही आमची जात, हा आमचा धर्म, हा आमचा पंथ, हा आमचा देश अशा आकुंचित वातावरणांतून त्यांना बाहेर आणण्याचा प्रयत्न केला जातो. ‘ विश्वचि माझें घर ’ अशी त्यांची मनोवृत्ती बनावी अशी माझी महत्त्वाकांक्षा आहे. साधारणपणें इतरत्र मुलांना देशाभिमान किंवा धर्माभिमान शिकवून त्यांचीं मनें मुद्दाम आकुंचित केलीं जातात. त्यामुळें जगांतील इतर राष्ट्रांच्या संस्कृति व भाषा यांचें आकलन करणें त्यांना दुष्कर होतें. भावी आयुष्यांत जेव्हां दोन संस्कृतींचें एकीकरण व्हावें अशी इच्छा जागृत होते, त्या वेळीं ही आकुंचित बुद्धि आड येते. विश्वबंधुत्वाची भावना उद्भूत न होण्यास ही परिस्थिति कारणीभूत झाल्याशिवाय रहात नाहीं.

**जगांतील सर्व राष्ट्रांचें अध्यात्मिक ऐक्य स्थापन करणें हें माझ्या शिक्षणसंस्थेचें ध्येय आहे.** अखिल मानवजातीची अध्यात्मिक उन्नति करण्याचा ज्यांचा उद्देश आहे, त्यांचें ही संस्था केंद्र व्हावें अशी माझी इच्छा आहे. मी युरोपियन राष्ट्रांत प्रवास करीत असतां माझ्याच विचाराचे मला जे कित्येक लोक आढळले, त्यावरून माझी कल्पना फलद्रूप होण्याचा योग येईल अशी मला आशा वाटूं लागली आहे. हे लोक जरी आज अप्रासिद्ध असले तरी ते सत्य, प्रेम आणि विश्वबंधुत्व या

तत्वांच्या आधारावर भविष्यकाळीं क्रांति करून दाखवितील असा मला दृढ विश्वास आहे.

पूर्वीची शिक्षणपद्धति ध्येयहीन होती, केवळ बौद्धिक शिक्षण देणें एवढेंच तिचें कार्य होतें. विद्यार्थ्यांच्या हृदयाला जाऊन भिडणारें असें शिक्षण देण्यांत येत नसे. लौकिक व्यवहारांत व संसारांत विद्यार्थ्यांचें आयुष्य यशस्वी कसें होईल हीच त्या शिक्षणाची दृष्टि असे. त्यांची आत्मिक उन्नति कशी होईल किंवा त्यांच्या जन्माची सफलता कशानें होईल, याकडे त्या शिक्षणाचें लक्ष नसे.

उदात्त ध्येयावर माझी श्रद्धा आहे, ही गोष्ट स्पष्टपणें सांगणें अवश्य आहे. आजकालच्या काळांत ही नाजुक गोष्ट जाहीर करणें म्हणजे थोडेसें धाडसच आहे. आजकालची आपली स्थिति पाहिली तर दररोजच्या ठराविक चाकोरीपलीकडे जावयाचें नाहीं अशी आपली एकंदर वागणूक आहे. वर्तमानपत्रांतील हकीगती वाचण्यापलीकडे आपण अधिक कांहीं करीत नाहीं. ह्या वर्तमानपत्रांनीं आपलें जीवन अगदीं निर्जीव व नीरस केलें आहे. त्यांच्या योगानें आपल्या अंगीं केवळ वरवर पहाण्याची दृष्टि उत्पन्न केल्यामुळें खोल तत्त्वज्ञानांत शिरावयाची आपल्याला इच्छा उत्पन्न होत नाहीं. अशा परिस्थितींत मार्ग काढून मानवजातीच्या अंतरंगांत प्रवेश करणें मोठें कठीण काम आहे.

पण त्यांतल्या त्यांत मला एवढें समाधान आहे कीं गेलीं तीस वर्षें ज्या ध्येयानें प्रेरित होऊन मी शिक्षणकार्याला वाहिलीं त्या ध्येयाची रूपरेषा मला जगापुढें मांडतां आली. ध्येयदेवतेचा अव्यभिचारी उपासक या नात्यानें मला माझें उद्दिष्ट जगाला पटविण्याचा प्रयत्न केला पाहिजे व 'माझें म्हणणें' त्यांना स्पष्टपणें समजावून दिलें पाहिजे. **विश्वबंधुत्व हें माझ्या शिक्षणसंस्थेचें ध्येय आहे. निरनिराळ्या देशांचे आणि निरनिराळ्या संस्कृतींचे लोक ज्या ठिकाणीं बसून विचारविनिमय करूं शकतील असें ठिकाण माझ्या शिक्षणसंस्थेशिवाय दुसरें सांपडणार नाहीं.** मानवजातीचें आध्यात्मिक ऐक्य साधणें हें माझें जीवित ध्येय.

आहे. जगानें माझी ही सेवा मान्य करावी. जगाला जर माझें हें ध्येय मान्य झालें तर माझें जीवितकार्य सफल झालें असा मला आत्मविश्वास येईल."

विश्वभारती ही शिक्षणसंस्था प्रारंभीं अध्यात्मिक संस्कृतीचें शिक्षण देणारें विद्यालय म्हणून काढण्यांत आली. पुढें तिचें जागातिक स्वरूपांत रूपांतर झालें. विश्वभारती म्हणजे जगांतल्या सर्व संस्कृतींचें एकीकरण करणारी संस्था. नंदलाल बोस आणि असितकुमार हलधर यासारखे सुप्रसिद्ध चित्रकार, अजितकुमार चक्रवर्ती आणि सतीशचंद्र रे यासारखे लेखक, द्विजेंद्रनाथ टागोर यांसारखे तत्त्वज्ञानी त्यांच्या विश्वभारतींत अध्यापक म्हणून राहिले होते. अशा प्रकारें विश्वभारतीला सर्वोत्तमत्व समर्पण करण्यासाठीं रवींद्र बाबूंनीं जे परिश्रम घेतले ते खरोखरच अपूर्व होत.

'यत्र विश्वं भवत्येकनीडम्' हें विश्वभारतीचें ध्येयवाक्य आहे. विश्वभारतीबद्दल रवींद्रनाथांनीं जे उद्गार काढले आहेत त्यावरून ह्या विश्वसंस्थेची संपूर्ण कल्पना येईल. रविबाबू म्हणतातः—

"Visva Bharati represents-India where she has her wealth of mind which is for all. Visva--Bharati acknowledges India's obligation to offer to others the hospitality of her best culture and India's right to accept from others their best."

# प्रकरण सहावें

रवींद्रनाथासारख्या ध्येयवादी महानुभावाची विचारसरणी लक्षांत यावी व त्यांच्या उत्कृष्ट विचारांचा आस्वाद घेतां यावा म्हणून त्यांच्या वाङ्मय–सागरांतील कांहीं वाग्रत्नें वाचकांपुढें मुद्दाम ठेवीत आहेत.

## राष्ट्रीय शिक्षण

"आपल्या देशांत आजकाल राष्ट्रीय विश्वविद्यालय स्थापण्याचा प्रयत्न ठिकठिकाणीं चालत असलेला दिसतो. लोकशिक्षणाची जबाबदारी लोकांवरच आहे, कारण समाजाची उन्नतिच नव्हे, तर त्याचें स्थैर्यही शिक्षणावरच अवलंबून आहे. तेव्हां लोकांना शिक्षण देण्याचें काम लोक स्वतःच्याच हातीं घेऊन ते स्वतंत्रपणें जर पार पाडूं शकले नाहींत, तर अर्थात् तें काम तुमच्या समाजाविषयीं विशेषसें प्रेम नसलेल्या परकीय लोकांच्या हातीं पडणारच !

राष्ट्रीय विद्यालय म्हणजे काय ? याविषयींची स्पष्ट कल्पना आपण करून घेतली पाहिजे.

ही गोष्ट आज सर्वांना विदित आहेच कीं, ज्याला भारतीय राष्ट्र म्हणतात तें हिंदुस्थानांत रहाणाऱ्या हिंदु, मुसलमान, खिस्ती इत्यादि भिन्न भिन्न धर्मसंप्रदायांतल्या निरनिराळ्या जाति एकवटून झालेलें आहे. अर्थात्, या निरनिराळ्या जाती व संप्रदाय यांचें ज्या शिक्षणाच्या योगानें मानसिक ऐक्य साधतां येईल, असें शिक्षण देणारी संस्थाच राष्ट्रीय विद्यालय या संज्ञेला पात्र होईल.

आपल्या देशांत एका राजसत्तेखालीं असलेल्या लोकांचे स्वार्थसंबंध स्थायिक होऊन त्यांचें राष्ट्रीय ऐक्य घडून येणें शक्य नाहीं. यासाठीं आमच्या ऐक्याचें क्षेत्र केवळ बाहेर असणें उपयोगाचें नाहीं, तें अंतर्यामींच असलें पाहिजे, म्हणून लोकांच्या मनाचें ऐक्य ज्ञानाच्या द्वारें घडवून आणणें हें राष्ट्रीय विद्यालयाचें उद्दिष्ट असलें पाहिजे.

अंधेरांत मनुष्य केवळ स्वतःला पाहतो. दुसरा कोणी तेथें असेल

ह्याचें ज्ञान त्याला नसतें. म्हणून अंधेरांत माणसाला वाटतें कीं आपण एकटेंच आहों. उजेडांत मनुष्यें परस्परांना पाहूं शकतात, व त्यामुळें तीं अधिक निर्भय होतात.

ज्ञानाचा प्रकाश हा परस्परांच्या ओळखीचें व मनांच्या एकीकरणाचें एक मुख्य साधन आहे. परस्परांच्या ज्ञानाचें असें एकीकरण करणें हेंच राष्ट्रीय विद्यालयाचें काम आहे. हिंदुस्थानांतल्या सर्व जाति व संप्रदाय यांची परस्परांना चांगली ओळख व्हावी व त्यांच्या मनांचें एकीकरण व्हावें हें हवें असेल तर तें घडवून आणणारी विद्या राष्ट्रीय विद्यालयांतून दिली गेली पाहिजे.

पण धर्मासंबंधानें लोकांचें एकीकरण करणें जितकें कठीण आहे तितकें विद्येपुरतें एकीकरण करणें कठीण नाहीं. आतांपर्यंत आपल्या देशांत जेवढीं राष्ट्रीय विद्यालयें स्थापन झालीं आहेत, तेवढीं बहुतेक हिंदु विद्यालयें आहेत. यामुळें या संस्थांतून मुख्यतः हिंदूंची शास्त्रें व हिंदूधर्म शिकविण्याकडे शिक्षकांचा रोख असतो. याच्या योगानें परस्परांमधील भेद दूर होणें तर राहोच, पण उलट भेदबुद्धी मात्र दृढ होते.

ऐतिहासिक अवस्थाभेदामुळें मनुष्यामनुष्यांत स्वभावतःच धर्मभेदाला कारण उपस्थित होतें. त्याच्याबरोबरच आमच्या अंगीं जडलेल्या आरामाच्या संवयी व अहंकारभाव हीं प्रबल झाल्यामुळें निष्कारण दुसऱ्याशीं वितंडवाद घालण्याची इच्छा मनुष्याच्या मनांत उत्पन्न होते.

राष्ट्रीय विद्यालयांत सर्वधर्मांना जवळजवळ स्थान दिल्यानें त्यांच्यातला विरोध शांत न होतां उलट त्याची ज्वाला अधिकच भडकेल ! कारण, भिन्न भिन्न धर्मीय लोकांत सत्य कशाला म्हणावें याच्याच विषयीं मुळीं वाद असतो. दोन धर्ममतांपैकीं एकाला सत्य म्हटलें म्हणजे दुसऱ्याला असत्य म्हणावेंच लागतें. इतकेंच नाहीं तर धर्माचरणाच्या संबंधानेंही असाच मुळापासून विरोध उत्पन्न होतो. एका पूजाविधिप्रमाणें जीवहत्या हें एक अवश्य कर्तव्य असतें. तर दुसऱ्या धर्माच्या तत्त्वाप्रमाणें हिंसा निषिद्ध असतें. अशा दोन परस्परविरोधी धर्ममतांचें एकीकरण करूं

पहाणें म्हणजे दोन विरुद्ध दिशांना जाणाऱ्या आगगाड्यांची भेट करूं पहाण्यासारखें आहे. अशी भेट करविण्यांत केव्हांना केव्हां तरी अपघात घडलाच पाहिजे. म्हणून निरनिराळ्या धर्मसंप्रदायांना एकत्र आणूं पहाणें व्यर्थ आहे.

जेथें देशांतल्या सगळ्या लोकांचें अथवा समाजाचें संमेलन होऊं शकतें, त्यालाच खरें राष्ट्रीयत्व म्हणावयाचें. कांहीं ठराविक व्यक्तींचे संघ विशेष कार्यासाठीं स्वतंत्रस्थानीं खुशाल भरोत; पण राष्ट्रासंबंधीं जीं कार्यें करावयाचीं, त्यासाठीं सर्वसामान्य अशी एकादी बैठक असणें अवश्य आहे. त्याशिवाय कोणतेंही राष्ट्रकार्य नीटपणें होत नाहीं."

## सान्त आणि अनन्त

"पुण्यसंचय केल्यानेंच स्वर्ग प्राप्त होतो असें लोक म्हणत आले आहेत. पण मी म्हणतों कीं, पुण्याईच्या जोरावरच मी स्वर्गाहून या मृत्युलोकीं आलों आहे. स्वर्गांतल्या संकुचित स्थानीं माझ्या ठायीं प्रकाश विकास पावला, तेव्हां माझ्या ठायीं सर्वप्रकारें अपूर्णता असतांनाही मी ह्या मृत्युलोकीं येऊन स्वर्गाला धन्य केलें. एक संन्यासी म्हणाला, 'जी भवबंधनाची शृंखला मला बद्ध करून ठेवीत आहे ती तोडून टाकून अनंत प्राणांच्या प्राप्तीसाठीं मी आतां तपश्चर्या करीन.' तो जगाला तुच्छ माया, अंधकाराची गुहा–म्हणून दूर चालता झाला. आकाशांतली रस-गंध-वर्ण-छटा सर्व त्याच्या चैतन्यांतून पार घालविण्यांत आली, आणि तो आपल्या ठायींच सर्व चित्तवृत्तींचें आकर्षण करून अनंताची प्राप्ती करून घेण्याची प्रतिज्ञा करून बसला. इतक्यांत कोठूनशी एक मुलगी आली, ती त्याच्या दृष्टीस पडली. ती मुलगी अगदीं निराश्रित होती. संन्यासी तिला आपल्या गुहेंत घेऊन गेला. त्या मुलीनें हळूहळू त्याच्यावर स्नेहपाश टाकला. तेव्हां संन्यासी मनाचा धिक्कार करूं लागला. त्याला वाटूं लागलें कीं, ही मुलगी प्रकृतीची मायावी दूतिका आहे. प्रकृतीनें आपणांस अनंतापासून दूर ठेवून मर्यादित क्षेत्रांत बद्ध करून ठेवण्यासाठींच तिला पाठविलें आहे. असें

विचारांचें युद्ध त्याच्या डोक्यांत चाललें असतां एके दिवशीं क्रोधवश होऊन त्यानें त्या मुलीचा त्याग केला. मुलगी ज्याला आपलें आश्रय-स्थान समजत होती तो तिचा आधारस्तंभ निघून जातांच ती तोडून टाकलेल्या वेलीप्रमाणें आक्रोश करीत मातींत लोळत पडली. इकडे तो संन्यासी जसजसा दूर जाऊं लागला तसतसा त्या मुलीचा आक्रोशध्वनि त्याच्या हृदयांत प्रतिध्वनि उत्पन्न करूं लागला. अखेर ही मुलगी मायावी नाहीं, खरी आहे, हें हृदयाच्या वेदनांनीं त्याला जाणविलें. मनाच्या अशा अवस्थेंत तो दूर उभा राहून जगाकडे पाहूं लागला. तेव्हां माधुर्य आणि स्नेह प्रीति इत्यादि संबंधाची माण-साच्या ठायींची रसज्ञता त्याच्या मनांत जागृत झाली. तो म्हणाला, ' मी हातांतला दंडकमंडलू फेकून देतों मला त्याची जरूरी नाहीं. मर्यादेचा त्याग करून कोणतेंही सत्य प्राप्त होणार नाहीं. या लहानशा मुलीवर प्रेम केल्यानेंच त्या स्नेहरसामध्यें अनंताची प्राप्ती मला होत आहे. बाहेर अनं-ताचा प्रकाश थोडाच आहे ! तो तर अंतर्यामींच आहे. '

मर्यादेच्या संगतींतच अनंताचें अनंतत्व आहे ही गोष्ट उपनिषदांतही सांगितली आहे. अविद्या किंवा सीमेचें ज्ञान हेंच केवळ ज्ञान असें सम-जण्यांत अंधतामसिका आहे. पण विद्या व अविद्या जेव्हां एकत्र होतात, तेव्हांच सत्याचें ज्ञान होतें.

मर्यादित जगाला अनंतापासून वेगळें काढून त्यांत बद्ध होऊन रहाणें व्यर्थ आहे. काव्यांतून शब्दांना हाकलून लावून काव्यरस सेवूं पहाण्या-सारखें तें आहे. अशा माणसाला काव्यरस कोठून प्राप्त होणार ? रस काढून नुसते शब्द ठेवणाऱ्या पंडिताच्या मूर्खतेला तर सीमाच नाहीं असें म्हटलें पाहिजे. ''

## अध्यात्मिकता.

" पाश्चात्य सुधारणा केवळ जडवादमूलक आहे, तिच्यांत अध्यात्मि-कता नाहीं असें म्हणणारे पुष्कळजण आहेत. पण ही गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे कीं, मनुष्य समाजांत जें जें म्हणून कांहीं मंगलकारक

दिसतें त्याच्या मूळाशीं अध्यात्मिक शक्ती असलीच पाहिजे. यंत्राच्या द्वारें मनुष्याला सत्याची प्राप्ति कधीं होत नसते. ती आत्म्याच्याच द्वारें प्राप्त करून घ्यावी लागते. युरोपांत जर कोठें उन्नति दिसत असली तर तिच्या मुळाशीं अध्यात्मिक शक्ती आहे असें निश्चयपूर्वक समजावें. उन्नति ही कांहीं जडसृष्टी असूं शकत नाहीं. ती अंतर्गत आत्म्याचाच बाह्य विकास म्हटली पाहिजे. आपण पाश्चात्य सुधारणेचें बाह्यस्वरूप तेवढें पहातों. पण त्याच्या मुळाशीं जी आत्मिक शक्ती आहे ती पहात नाहीं.

आत्मत्याग आणि अध्यात्मिक शक्ती यांच्यांत परस्परसंबंध नाहीं काय ? ती अध्यात्मिकता ही काय केवळ संसाराचा त्याग करून राना-वनांत जाऊन रहाण्यांतच आहे ? ती काय केवळ जपमाळ घेण्यांतच आहे ? अध्यात्मिक शक्ती मनुष्याला वीर्य देणारी नाहीं काय ? देशहिता-साठीं व लोकहितार्थ सर्वस्वाचा व प्राणांचाही त्याग करणारांची उदा-हरणें युरोपखंडांत दृष्टीस पडत नाहींत काय ? हा त्याग करण्यास आत्मिक शक्ती लागली नाहीं असें कोण म्हणूं शकेल ?

असा कोणताही समाज आढळणार नाहीं कीं, ज्याची उन्नति दुःखें सहन करण्याच्या शक्तीच्या पायावर उभारलेली नाहीं. जे केवळ जड-वस्तूंचे दास आहेत त्यांच्या अंगीं तीं दुःखें सहन करण्याची शक्ती नसते. मनुष्यासाठीं, देशासाठीं, ज्ञानासाठीं, प्रेमासाठीं, हृदयाच्या स्वातंत्र्यासाठीं दुःखांना, फार काय पण मृत्यूलाही—जाणून बुजून वरण्यास मनुष्याला कोण बळ देतें ? मनुष्य जड वस्तूला स्वतःच्या प्राणाहून अधिक प्यार कधींही समजणार नाहीं. त्याला दुःखें सहन करण्यास व प्राण त्यागा-साठीं उत्सुक होण्यास लावणारी शक्ति जडवस्तूच्या आकर्षणाहून खास निराळी असली पाहिजे. अध्यात्मिकता हीच ती शक्ति होय. आणि जर परहितासाठीं स्वार्थत्याग किंबहुना प्राणत्याग केल्याचींही उदाहरणें पाश्चात्य देशांत सांपडतात तर तेथें अध्यात्मिक शक्ती नाहीं असें कसें म्हणतां येईल ?

केवळ जड वस्तूंच्या प्राप्तीनें कोणाची बलवृद्धी किंवा उन्नती होत

नाहीं. आज जड शक्तीच्या जोरावर युरोपियन राष्ट्रें जगावर राज्यें करीत आहेत असें कित्येक लोक समजतात. जडवादी या असत्याला उराशीं कवटाळून धरोत; पण खरी गोष्ट अशी आहे कीं, ती उन्नति किंवा तें बळ क्षणिक नसेल, शाश्वत टिकणारें असेल तर अध्यात्मिक शक्तिच त्याच्या मुळाशीं असली पाहिजे हें निश्चित आहे.

बौद्धधर्म हा कांहीं विषयासक्तीचा धर्म नव्हता, ही गोष्ट सर्वांना मान्य झालेली आहे, पण त्याबरोबर हीही गोष्ट खरी आहे कीं, हिंदुस्थानांतला बौद्धधर्माचा काळ व हिंदुस्थानच्या सर्वांगीण उन्नतीचा काळ एकच होता. ज्यावेळीं बौद्धसुधारणा परमावधीस जाऊन पोंचली होती त्याच वेळीं आपल्या देशांत शिल्प, कला, वाणिज्य, शास्त्रज्ञान, आणि राज्याची भरभराट व विस्तार यांचें पाऊल जसें पुढें पडलें तसें दुसऱ्या कोणत्याही काळांत पडलें नाहीं. याचें कारण हेंच कीं जेव्हां मनुष्याचा आत्मा जडतेच्या बंधनापासून मुक्त होतो तेव्हांच त्याच्या सर्व शक्ति ( बौद्धिक, शारीरिक, मानसिक, अध्यात्मिक, नैतिक, इ. ) आनंदित व विकसित होतात, आणि सर्व बाजूंनीं उन्नति करण्यास मनापासून झटतात. अध्यात्मिकता ही त्या सर्व शक्तीच्या केंद्रस्थानीं असते. कारण, सर्वांना चालन देणारा जो आत्मा त्याची ती शक्ति आहे, ती अंतर्बाह्य कोणत्याही शक्तीची वाढ खुंटूं देत नाहीं.

गीतेंत एक उत्तम आशाप्रद वचन आहे. त्याचा अर्थ असा आहे कीं, अल्प मात्र धर्मसुद्धां मोठ्या संकटांतून मनुष्याला वांचवितो. ज्या समाजांत धार्मिकता—अर्थात् अध्यात्मिकता—स्वल्पप्रमाणानें कां होईना, पण जिवंत असेल, त्या समाजांत दुसऱ्या कितीही वाईट व अनर्थकारक गोष्टी घडत असल्या तरी त्या अल्प धार्मिकतेमुळें त्या समाजाचें रक्षण होऊन त्याला महत्पद प्राप्त होतें.''

## मनुष्यजीवनाची सार्थकता

"आपलें जीवन आज आहे, उद्यां नाहीं, म्हणून त्याचा धिक्कार करून चालावयाचें नाहीं. कांहीं लोक असे असतात कीं, बाहेरचा हा

क्षणस्थायी भाव माणसाच्या मनांत दृढ व्हावा म्हणून संसार ही केवळ माया आहे, त्यांत कांहीं सार नाहीं, असें ते म्हणत असतात. पण हें त्यांचें म्हणणं बरोबर आहे काय ? प्रातःकाळीं दवाचे बिंदू गवतावर पडतात, आकाशांत मेघांची गर्दी दिसते, सकाळीं प्रकाश पडतो, या गोष्टी मि या आहेत ? यांना अनिष्ट म्हणून उडवून देणें योग्य नाहीं. अनित्याच्या द्रोणांत नित्यरूपी अमृत ठेवलेलें आहे. म्हणून म्हणतों कीं, ते प्रातःकाळचे दवबिंदु, ते मेघ, तो प्रकाश हीं धन्य होत ! आपणही त्यांच्यासारखे या जगांत आहों. मग आपणांलाही त्यांच्यासारखी आपल्या जीवनांत त्या आनंदाची पूर्णता करतां येणार नाहीं काय ?

स्वतःचा धिक्कार केव्हां करावा ? जेव्हां आपणांला त्या आनंदाच्या सुखांत आपला स्वतःचा सूर मिळवितां येणार नाहीं तेव्हां.जेव्हां आपल्या अंतर्यामांतले रिपु प्रबळ होऊन आनंदाच्या नित्य स्वरूपाला आच्छादून टाक-तील तेव्हां. आपण पहातोंच कीं, सकाळ होते न होते तोंच सर्व बाजूंस फुलें फुलतात. त्यांनीं अनंताला आत्मसमर्पण केलेलं असतें. अनंतानें त्याचें ग्रहण केलेलें असतें. तीं क्षणभंगुर म्हणून आपणांस त्यांचा त्याग करतां येत नाहीं. आपण स्वतःच्या सुखासाठीं त्यांचा स्वीकार किंवा त्याग, करण्यांत चूर होऊन रहातों तेव्हां मनुष्यत्वाचें नित्य स्वरूप कोठें असतें ? आपलें जीवन जर खरें खरें दान असेल तर तें क्षणभंगुर अशा द्रोणांत सुद्धां पूर्णत्व व नित्यत्व प्रकट केल्याशिवाय रहाणार नाहीं. असें जें दान तोच खरा प्रकाश व तीच खरी जागृती. फुलाची कुंडी स्वतःचें दान करीत नाहीं; ती गुप्त असते. फूल स्वतः आपलें भांडारद्वार खुलें करतें. तें जागृत असतें. ज्या माणसाला आत्मसमर्पण करतां येत नाहीं, तो त्याच्या जन्मांत केव्हांच जागृत नसतो, असें म्हणावें लागतें. जो स्वतःच्या मध्येंच स्वतःला कोंडून घेऊन रहातो, तो सर्वांच्या ठायीं स्वतःची उपलब्धि करून घेऊं शकत नाहीं. सर्वांच्या ठायीं आपली जी जागृती तिला कालाची सीमा घालून व तिला मर्यादित करून चालत नाहीं. ती एका क्षणांतच अमर्याद होते. क्षणस्वामित्वाचा दोष तिला पोहोंचूं शकत नाहीं. ती जागृति म्हणजे अमरलोकची जागृति असते.

अमरलोकांत केवळ सुखच नसतें. दुःखही नसतें, पण त्या दुःखापासूनच आनंदाची सृष्टी होते. बाह्यसृष्टींतही एकादे वेळीं लख्ख प्रकाश पडलेला, तर एकादेवेळीं मेघाची छाया पडलेली आपण पहातों. सृष्टीच्या एका रागिणींतल्या या दोन ताना असतात. दोघींतही सौंदर्याची विचित्रता दिसते. कारण यांची ही क्रीडा अनंताच्या मांडीवरची ही क्रीडा असते. तसेंच करून संसारांतलीं सर्व दुःखें, हानी, मृत्यु वगैरे गोष्टींना सज्ज करून नित्य काळाच्या भूमिकेवर जर आपण ठेवूं शकलों तर मग या गोष्टी केवळ आपल्याच क्षुद्रतेंत बद्ध होऊन रहात नाहींत. आपलें जीवन आपणांस ग्रह, तारा, नक्षत्राप्रमाणें—प्रातःकाळच्या शुक्रताऱ्याप्रमाणें शुभ्र व संपूर्ण करतां येतें. मग नित्यस्वरूपाशीं आपणांस देवघेव करतां येतें. संसारतीरावरल्या आपल्या क्षुद्र घरांत मोठमोठ्यांचें येणेंजाणें सुरूं राहतें. त्यामुळें त्यांचें आपणांस दर्शन घडतें व त्यांच्याशीं संभाषण करावयास सांपडतें. एवढें आपणांस करतां आलें तर आपल्या जीवनाचें सार्थक होईल. पण आपणांस तें करतां येत नाहीं. आपल्या मनाचें द्वार आपण बंद ठेवतों. त्यामुळें महान पुरुषांना जाण्यायेण्याला मार्ग रहात नाहीं. अशा दुःखानें व्याकुळ झालेला मनुष्य प्रार्थना करतो कीं, '**असतो मा सद्गमय !**' असत्याच्या तुच्छतेपासून मला वांचीव. छोट्याशा फुलांत जशी तुझी अनंत शोभा पूर्णरूपानें दृश्यमान होतें, तशी माझ्या या छोट्या जीवनांत ती पूर्णत्वानें प्रकट होऊं दे. ''

---

# प्रकरण सातवें

## चित्रकार रवींद्रनाथ

कविवर्य रवींद्रनाथ अलीकडे शब्दसृष्टीचा त्याग करून रेखासृष्टीशीं एकतानता पावले आहेत. केवळ शब्दामध्यें जखडलेलें आपलें काव्य सबंध जगाला आकलन होण्यासाठीं ते आतां चित्ररूपानें जगापुढें मांडीत आहेत. चित्राची भाषा सर्व जगाला समजत असल्यामुळें आपल्या काव्याचा परिचय सबंध जगाला करून देण्याच्या बुद्धीनें त्यांनीं चित्र-रेखाटणाला प्रारंभ केला आहे. त्यांच्या विश्वैक्याच्या आणि विश्वबंधुत्वाच्या कल्पनेशीं त्यांची ही चित्रकलेची कल्पना अत्यंत सुसंगत आहे. काव्य आणि चित्र हीं एकाच नाण्याचीं दोन अंगें असल्यामुळें खरा कवि हा खरा चित्रकार असतो. ज्या गोष्टी काव्यांत ध्वनित करतां येत नाहींत त्या चित्रकलेच्या द्वारें यथार्थतेनें चित्रित करतां येतात. रवींद्रांचीं चित्रें काव्यमय व गूढार्थपूर्ण असतात. त्यांच्या चित्रांत काय अर्थ भरला आहे तो सामान्य माणसाला समजत नाहीं. त्यांचें प्रत्येक चित्र म्हणजे चिन्ह, प्रतीक, संकेत, संज्ञा किंवा लक्षण या स्वरूपाचें असतें. त्यांच्या चित्रकलारहस्याचा उलगडा होऊन त्यांच्या चित्रांचें सामान्य मनुष्याला आकलन करतां यावें या हेतूनें त्यांनीं स्वतःच्या चित्रकलेविषयीं काढलेले उद्गार पुढें देत आहे.

## माझीं चित्रें

"पांच वर्षांचा असतांना मला जेव्हां पुस्तकांतील धडे वाचावे लागत त्यावेळीं पुस्तक ही कांहीं तरी अद्भुत, अमानुष वस्तु आहे असें मला वाटे. जगांत जितकी निर्दोषता आणि पूर्णता असेल ती सर्व ह्या पुस्तकांत खचून भरलेली आहे असा माझा समज होई. वाङ्मयाचें गूढ स्वरूप ह्या छापील पानांतून आविष्करण पावत आहे अशी माझी कल्पना होई. माझ्यासारख्या अप्रबुद्धालाही कविता लिहितां येतात हें जेव्हां मला आढळून आलें तेव्हां वरची कल्पना आपोआपच नाहिशी झाली. तेव्हांपासून मला सुचणाऱ्या कल्पना मी शब्दांत ग्रथित करूं लागलों.

१६ व्या वर्षी मला जशी काव्याची आकस्मिक स्फूर्ति झाली त्याप्रमाणें गायनाचीही झाली. तेव्हांपासून मी काव्य आणि संगीत या दोन क्षेत्रांत विहार करूं लागलों. माझें मलाच या गोष्टीचें आश्चर्य वाटूं लागलें.

माझें कवितालेखन चालू असतांना माझा पुतण्या अवनींद्रनाथ टागोर यानें आधुनिक पद्धतीवर पौर्वात्य चित्रकलेचें पुनरुज्जीवन करावयास सुरवात केली होती. त्याचें चित्ररेखाटन पाहून मला स्वतःविषयीं एक-प्रकारचा अविश्वास उत्पन्न होई व असें वाटे कीं चित्रकलेसाठीं कांहीं आपला जन्म झाला नाहीं. चित्रकला आपल्यासाठीं नाहीं; काव्यकला आपल्यासाठीं आहे.

निर्जीव वस्तूंना सजीव करण्याचें सामर्थ्य कलेंत असल्यामुळें आणि मी कलेचा मोठा भोक्ता असल्यामुळें जरी मला रेखा आणि रंग यांची माहिती नव्हती तरी चित्रकलेंतील संवादित्व व चैतन्य या गोष्टींचें मला ज्ञान झालें. एकादें बाह्य दृश्य किंवा अंतर्दृश्य रंगविणें किंवा एकाद्या गोष्टीचें हुबेहूब प्रतिबिंब काढणें हा कांहीं चित्रकलेचा हेतु नाहीं. नेत्रांच्या द्वारें कल्पनाशक्तीरूपी फलकावर एकाद्या गोष्टीचें संपूर्णत्वानें व साक-ल्यानें चित्र उभें करणें हा चित्रकलेचा खरा हेतु आहे. ह्या चित्राचा अर्थ काय असें आपल्याला विचारावयाची जरूरीच रहात नाहीं. अशा चित्रांत असंबद्धता किंवा संदिग्धता मुळींच असत नाहीं. चित्रकाराच्या जें काय मनांत असेल तेंच प्रेक्षकाच्या मनःपटलावर उमटतें.

नुसत्या कांहींतरी वांकड्यातिकड्या रेघा काढलेल्या असल्या म्हणजे आपल्याला त्यांतून कांहींच बोध होत नाहीं. ज्या गोष्टींची कल्पना येण्यासाठीं त्यांची योजना करण्यांत आलेली असते ती गोष्ट आपल्यापुढें मूर्तिमंत उभी रहात नाहीं. अशा रेघांनीं खरें म्हटलें असतां कांहीं कार्य होत नाहीं आणि प्रेक्षकाचें मन उगीचच क्षुब्ध होतें. कारण त्याला त्यांतून कांहींच अर्थबोध होत नाहीं. मी काढलेली रेघामय चित्रें अशाच प्रकारचीं झालीं आहेत. रस्त्यावर खूपशी गर्दी जमावी, कोणी इकडे तिकडे सैरावैरा हिंडावे, सगळीकडे अंदाधुंदी व गजबजाट

व्हावा, कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत नसावा अशा प्रकारचीं असं-बद्ध व विस्कळित चित्रें मी आरंभीं काढीत असे.

माझ्या चित्ररेखाटनाला अशाप्रकारें न कळत पण प्रतिभाप्रेरित रीतीनें प्रारंभ झाला. चित्रकलेमध्यें मला अधिकाधिक गोडी वाटूं लागली आणि बाकीचा वाङ्मयविषयक लेखनव्यवसाय सोडून मी चित्रकलेकडेच अधिक लक्ष पुरवूं लागलों. जगांतील उत्कृष्ट व अद्वितीय चित्रकार होण्याची महत्वाकांक्षा ही माझ्या मनांत कधींकधीं उत्पन्न होत असे. मी काढ-लेल्या रेघा कशीं निरनिराळीं स्वरूपें घेतात, त्यांचा एकमेकांशीं संबंध आला म्हणजे त्यांच्यांत कसें चैतन्य उत्पन्न होतें, त्यांच्यां-तून कशा जिवंत आकृति निर्माण होतात आणि त्या कशा बोलूं लागतात हें पहातांना माझें चित्त ब्रह्मानंदांत होई. मी काढलेल्या रेखाचित्रांत सर्व विश्व भरून राहिलें आहे असें मला वाटे. मूर्तिमंत विश्व उत्पन्न करण्याचें विश्वकर्म्याचें चातुर्य माझ्या अंगीं आहे हें पाहून माझें हृदय आनंदानें नाचूं लागे. वृक्ष, लता, पाषाण, नद्या, धबधबे, मेघ, ग्रह, तारका, खगोल आणि मानवी जीवनांतील विविध दृश्यें अशा अनेक प्रकारच्या गोष्टी रेखासमुदायांत विलीन असतात. ज्याला दृष्टी आहे त्यालाच ह्या गोष्टी जशा आहेत तशा दिसूं शकतात.

संपूर्ण चित्र पुरें होण्यापूर्वी ज्या असंबद्ध व कांहीं तरी रेघा ओढ-लेल्या असतात आणि कांहीं तरी पुसलेल्या असतात त्यांचा उपयोग अगदींच नसतो किंवा त्या पुसून टाकण्यालायक असतात असें नाहीं. उत्कृष्ट चित्रकाराच्या दृष्टीनें त्या निरर्थक नसतात. त्यांतून त्याला नवीन सृष्टी उत्पन्न करतां येते. अशा विस्कळित व असंबद्ध रेखावलयांतून नूतन सृष्टी निर्माण करण्याचें कार्य विश्वकर्म्याशिवाय इतरांना साधणें शक्य नाहीं.

प्रारंभींचा माझा हाच अनुभव होता. माझ्या ज्या वाकड्या तिंकड्या व बेपद्धतशीर रेघा असत, त्यांना मी सुसंबद्ध व संवादी स्वरूप दिलें

म्हणजे त्यांतूनच नवीन आकृति व नवीन दृश्यें निर्माण होत. कित्येक वेळीं जगाच्या पाठीवर उत्पन्न न झालेला एकादा प्राणी त्यांतून निघे तर एकाद्या वेळीं कल्पनासृष्टींत किंवा स्वप्नसृष्टींत विहार करणारा एकादा पक्षी त्या रेखावलयांतून निर्माण होई. कित्येक वेळां त्यांतून एकादा चेहराच दिसूं लागे आणि त्यावर राग, द्वेष, क्रोध, हास्य, करुणा इत्यादि मनोविकार उमटलेले दृष्टीस पडत. मी काढलेल्या रेखासमुदायांतून यदृच्छया ज्या आकृति निर्माण झाल्या त्यांची चित्रकलेंत तरी गणना करतां येईल काय याबद्दल मी जरी साशंक होतों, तरी मला त्यांत समाधान वाटत होतें, व त्यासाठीं इतर महत्त्वाचीं कामें उपेक्षून मी चित्र रेखाटण्यांत रममाण होत असे. संगीतकला श्रवणमनोहर कशी करावी याबद्दल जसें गायकाला स्वातंत्र्य असतें–कलेचें निरर्थक बंधन नसतें–त्याप्रमाणेंच आपली चित्रकला प्रेक्षकांना दृष्टिसुभग कशी होईल याची चित्रकाराला पूर्ण स्वतंत्रता असते. संगीतकलेनें शब्दबंधन झुगारल्याबरोबर ती उच्चपदाला चढली व तिनें खऱ्या कलेचें स्वरूप धारण केलें. मानवी जीवनांतील प्रसंग किंवा निसर्गसिद्ध सत्त्वें यांच्या बंधनांतून मुक्त होण्यानेंच कलेचा खरा उत्कर्ष व विकास होतो असें मला वाटतें.

मला कलेविषयक प्रमेयें कांहीं मांडावयाचीं नाहींत. ठराविक पद्धतीप्रमाणें किंवा कांहीं विशिष्ट धर्तीवर मी कांहीं चित्रें काढीत नाहीं. चित्रांच्या द्वारें एकादें तत्त्व जगापुढें मांडण्याचा माझा हेतूही नसतो. रेखा आणि रंग यांच्या सहाय्यानें कलेंत संवादित्व व चैतन्य उत्पन्न करण्यांत मला निरतिशय आनंद होतो. ''

## माझ्या चित्रांचा अर्थ

'' अनंताच्या शांततेंत विलीन होणाऱ्या सूक्ष्म बिंदूप्रमाणें ध्वनींची भाषा असते. सृष्टीच्या विविध स्वरूपांत विश्वाची चिरंतन वाणी प्रकट होत असते. नर्तन आणि चित्रकला यांच्या द्वारें विश्वाची मूक वाणी आपल्या कानांवर आदळत असते. सृष्टींतील प्रत्येक पदार्थ, रंग आणि रेषा यांच्या द्वारें आपलें अस्तित्व जगाला पटवीत असतो. ही क्रिया

उपयुक्तता किंवा तर्कशुद्धता या दृष्टीनें होत नसून त्या क्रियेंत प्रत्येक वस्तूच्या अस्तित्वाचें रहस्य साठविलेलें आहे.

पण अशा असंख्य गोष्टी आहेत कीं ज्या आपणांस माहीत आहेत पण ज्यांचें अस्तित्व आपण मान्य करीत नाहीं. त्या गोष्टी हितकारक असोत कीं अहितकारक असोत त्यांचें अस्तित्व मान्य केल्याखेरीज आपणांला गत्यंतरच नसतें. हें पुष्प पुष्परूपानें अस्तित्वांत आहे येवढें मान्य केलें तरी तें मला पुरें आहे; पण माझ्या व्यसनाच्या दृष्टीनें ही सिगारेट मला उपयुक्त असली तरी तिचें अस्तित्व मान्य करण्यास मी बांधला गेलों नाहीं.

पण कित्येक गोष्टींत अशाप्रकारचें आकर्षण किंवा वैशिष्ट्य असतें कीं त्या अस्तित्वांत आहेत असें कबूल करण्याखेरीज दुसरा मार्गच नसतो. सृष्टीच्या ग्रंथांत तांबड्या पेन्सिलनें अधोरेखित केलेल्या पंक्तीप्रमाणें त्या ठळक भासतात. आपलें लक्ष त्यांकडे वेधल्यावांचून रहात नाहीं आणि त्यांच्या वैशिष्ट्याबद्दल आपल्या मनांत शंकाही येत नाहीं.

ज्या गोष्टीच्या सत्यतेबद्दल शंकाही येणार नाहीं अशा पूर्ण सत्यतेच्या भाषेंत चित्रकार आपलें हृद्गत मांडीत असतो. त्या चित्रांत आपणांला पूर्ण यथार्थता प्रतीत झाली म्हणजे आपल्या चित्ताला समाधान वाटतें. त्या चित्रांत एकाद्या सुंदर स्त्रीचें रेखाटण केलें नसलें व आपल्या नेहमींच्या परिचयाच्या क्षुद्र वस्तूचें जरी रेखाटण केलें असलें तरी ते आपल्याला संतोष दिल्यावांचून रहात नाहीं. एकाद्या गोष्टीला व्यावहारिक दृष्टिनें मोल नसेल पण कलेच्या दृष्टीनें ती अमोल असूं शकेल. वस्तूला किंमत नाहीं, तिच्या यथार्थदर्शनाला किंमत आहे.

पुष्कळ लोक नेहेमीं मला माझ्या चित्रांचा अर्थ विचारीत असतात. माझीं चित्रें बोलकीं नसलीं तरी मी अगदीं स्तब्ध बसतों. चित्रांमध्यें जर कांहीं जिवंतपणा असला तर तीं आपणांहून आपला अर्थ व्यक्त करतील, त्यांच्याबद्दल निराळें स्पष्टीकरण नको, त्यांच्या प्रत्यक्ष स्वरूपापलीकडे त्यांत कांहीं अधिक नसतें. आणि जर त्यांच्या स्वरूपांवरूनच त्यांची यथार्थ किंमत दृष्टोत्पत्तीला आली, तर तीं चित्रें चिरंजीव होतात. त्या

त्या चित्रांच्या पाठीमागें एकादें शास्त्रीय सत्य किंवा नैतिक तत्त्व असलें तरी जोंपर्यंत त्यांच्या दर्शनावरून त्यांची किंमत ओळखतां येत नाहीं तोंपर्यंत त्या चित्रांना कांहींच महत्त्व येत नाहीं. तीं विस्मृतीच्या केरकचऱ्यांत धूळ खात पडून रहातात.

माझें काव्य रेषारूपानें व्यक्त करणें हीच माझी चित्रकला. एकादी कल्पना अभिव्यक्त करणें किंवा एकादी गोष्ट स्पष्ट स्वरूपांत मांडणें हें माझ्या चित्रकलेचें ध्येय नाहीं. माझ्या चित्रांत जर कांहीं विशेष असेल तर त्यांत दिसून येणारी स्वरबद्ध एकतानता व प्रतिभा हें होय.

माझ्या चित्रांना नांवें देणें अगदीं अशक्य आहे. त्याचें कारण असें कीं एकाद्या विषयाचा आधीं विचार करून मी आपलीं चित्रें काढीत नसतो. मी कांहींतरी काढावयाला सुरवात करतो आणि त्यांतून कांहींतरी अपूर्व व कधीं परिचित आकस्मिकपणें निर्माण होतें. शेत नांगरीत असतांना जनकराजाच्या नांगराच्या फाळानें जशी सिता वर आली, त्याप्रमाणें माझ्या कलमाच्या एका फटकाऱ्यासरशीं माझ्या चित्रांतून अदृष्ट असें कांहींतरी उद्भूत होतें. सीतेला ' सीता ' हें नांव ठेवणें सोपें होतें; हें नांव अमुकच एका विषयाचें असलें पाहिजे असा कांहीं निर्बंध नव्हता. पण माझ्या चित्रांचें तसें नाहीं; माझ्या चित्रफलकावर ज्या चित्रकन्या प्रगट होतात त्या अगदीं अकल्पित व अनिमंत्रित असतात. माझें कलम चालू झालें म्हणजे त्यांतून कांहींतरी अभावितपणें निर्माण होत असतें. तेव्हां मला त्याला अमुकच नांव कसें देतां येणार ? आकृतींना जर कांहीं नांवें दिलीं नाहींत तर त्या कशासंबंधींच्या आहेत हें कळण्याचें समाधान मिळत नाहीं. म्हणून माझी अशी सूचना आहे, कीं जे प्रेक्षक माझीं चित्रें पहातील त्यांनीं त्या चित्रांना नांवें द्यावींत व स्वतःचें समाधान करून घ्यावें. नांवाशिवाय चित्र निराधार आहे असें त्यांना वाटत असल्यास त्यांनीं चित्रांना नांवाचा आधार द्यावा व त्यांना संपूर्ण करावें "

# प्रकरण आठवें

## रवींद्रनाथांची राष्ट्रीयत्वाची कल्पना

राष्ट्रीयत्व व देशाभिमान या कल्पनांची मोठ्या तिरस्कारानें अवहेलना करणाऱ्या व अंतर्राष्ट्रीयत्वाची भक्तिभावानें पूजा करणाऱ्या रवींद्रनाथ टागोरांचे हिंदी राष्ट्रीयत्वाबद्दलचे विचार आजच्या काळांत तरी देशास विघातक आहेत हें सांगणें आवश्यक आहे. विश्वबंधुत्वाचा उदोउदो करण्याच्या भरांत ते देशबंधुत्वाला पारखे होत आहेत. अंतर्राष्ट्रीयत्वाच्या आवेशांत ते आपल्या मातृभूमीला लाथाडीत आहेत व 'वंदे मातरम्'ला झिडकारून 'वंदे भ्रातरम्' ची तरफदारी करीत आहेत. विश्वैक्य व विश्वबंधुत्व साधण्यासाठीं आपण 'वंदे भ्रातरम्' हा महामंत्र जपला पाहिजे अशी ते अपूर्व शिकवण देत आहेत. रवींद्रबाबूंची भारतभूमीबद्दल व भारतीय संस्कृतिबद्दल जी आदरबुद्धी आहे तीही अपूर्व आहे. अशा स्थितींत त्यांच्या अंतर्राष्ट्रीयत्वाच्या कल्पनेचा कसा मेळ घालावयाचा हा एक प्रश्नच आहे. ह्या प्रश्नाचें उत्तर रवींद्रबाबूंच्या वाङ्मयांत सांपडतें. राष्ट्रीयत्वाबद्दल त्यांची काय विचारसरणी आहे ती पुढें दिली आहे. त्यावरून त्यांची मनोरचना काय आहे याचा स्पष्ट उलगडा होईल.

### टागोर व राष्ट्रीयत्व

राष्ट्रीयत्वाची भावना हिंदुस्थानच्या रक्तांतच नाहीं, कारण ती भावना आकुंचित वृत्तीची असून मोठी भुरळ पाडणारी आहे. परमेश्वर आणि अखिल मानवजात यांच्यापेक्षां राष्ट्रीयत्व श्रेष्ठ आहे असें समजणारी हिंदुस्थानची मनोघटना नाहीं. पण खरोखरी पहातां हिंदुस्थानची मनोभावना श्रेष्ठ मनोवृत्तीची द्योतक व खरी उन्नतिकारक आहे. अखिल मानवजातीच्या कल्याणापेक्षां देश कांहीं जास्त नाहीं, अशी भावना प्रत्येकाच्या अंतःकरणांत रुजली पाहिजे. हिंदुस्थानांत नाना जाती नाना धर्म, व नाना पंथ असले तरी हिंदुस्थानांत एकप्रकारें आध्यात्मिक ऐक्य नांदणें शक्य आहे. नानक, कबीर, चैतन्य, तुकाराम इत्यादि सत्पुरुषांनीं ' सर्वांभूतीं

एकच परमेश्वर आहे ' ही भावना सबंध राष्ट्रांत उत्पन्न केल्यामुळें हिंदुस्थानांत अध्यात्मिक ऐक्य होणें सुलभ झालें आहे. हिंदुस्थानांत एक राष्ट्रीयत्वाच्या भावनेपेक्षां ही अध्यात्मिक ऐक्याची मनोवृत्ति सहज उत्पन्न होण्यासारखी आहे. हिंदुस्थानचें राजकीय ऐक्य साध्य न झाल्यास त्यांत मोठेसें अकल्याण नाहीं, पण पूर्ण अध्यात्मिक व सामाजिक ऐक्य नांदू लागल्यास हिंदुस्थान उन्नतिशिखरावर पोचला असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्या ऐक्यभावनेचा जगालाही फायदा झाल्यावांचून राहणार नाहीं.

आर्थिक आणि राजकीय तत्त्वांवर उभारलेलें आणि त्या तत्वांनीं जखडलेलें राष्ट्र ' राष्ट्र ' ह्या संज्ञेस पात्र होत नाहीं. राजकारण हें समाजाचें ध्येय नाहीं. समाजाला आपलें आस्तित्व राखण्याकरितां म्हणून ह्या भानगडींत पडावें लागतें. **मानवजातीची पूर्णावस्था हें राष्ट्राचें ध्येय आहे.** राष्ट्र हें उच्च सामाजिक जीवनाचा आदर्श असलें पाहिजे. राजसत्ता आणि व्यापार याच्या मोहांत गुरफटलेलें राष्ट्र अखिल मानवजातीला अवनतीला नेणारें आहे. व्यापार आणि सत्ता हें पाश्चात्य राष्ट्रांचें आदितत्त्व आहे. सामाजिक सहकार्य आणि समाजिक उत्कर्ष हें त्यांचें ध्येय नाहीं. राजसत्ता त्यांनीं हळुहळु काबीज करून घेतली तरी अध्यात्मिक बाबतीकडे त्यांचें पूर्ण दुर्लक्ष आहे. अध्यात्माच्या पीठावर राजकारणाची उभारणी झाली पाहिजे. खऱ्या राष्ट्रीयत्वाचें स्वरूप अशाच प्रकारचें आहे. हिंदुस्थानापुढील खरा प्रश्न राजकीय स्वरूपाचा नाहीं, सामाजिक स्वरूपाचा आहे. म्हणून राजकारण हें आपलें ध्येय आहे असें जर हिंदुस्थान मानूं लागला तर जगांत त्याचें हसें होईल ' भूतदयेपेक्षां देश अधिक आहे ' असें शिक्षण देणाऱ्या शिक्षणपद्धतीविरुद्ध आपण बंड करून ऊठलें पाहिजे. माणुसकीचें ध्येय हें राष्ट्रापेक्षां अधिक मोलाचें व अधिक महत्वाचें आहे.

हिंदुस्थानचा प्रश्न युद्धानें सुटणार नाहीं. हिंदुस्थानची योग्यता उच्च भूमिकेवरून जगाला शांति व प्रेम यांचे संदेश देण्याची आहे. युद्ध, सैन्य शस्त्रसामुग्री, दारुगोळा, इत्यादि गोष्टींमुळें जगाचा अधःपात होत आहे. तो थोपवून धरावयाचा असेल व आत्मोत्कर्ष साधावयाचा असेल तर

शांति, प्रेम व नीति या त्रिगुणांचा सर्वत्र परमोत्कर्ष झाल्याशिवाय गत्यंतर नाहीं.

दुसऱ्या राष्ट्रांच्या संस्कृतींची व सुधारणांची जर आपण उसनवारी केली आणि स्वतःचें आत्मिक सामर्थ्य वाढविलें नाहीं तर आपला विनाश काल समीप आला आहे असें समजण्यास हरकत नाहीं. पाश्चात्य राष्ट्रांची प्रगति कितीही झालेली असली तरी तिचा आपणांला कांहींही उपयोग नाहीं. तिच्याशीं स्पर्धा करणें हें जसें आत्मघातकीपणाचें आहे तसेंच तिचें अनुकरण करणें हें सुद्धां आपलें अनहित करणारें आहे. आपल्या रंगीबेरंगी प्रकाशानें प्रेक्षकांचे डोळे दिपविणाऱ्या व त्यांना क्षणभर आल्हाद देणाऱ्या तारगोळ्याप्रमाणें पाश्चात्यांची सुधारणा क्षणजीवी आहे. **आपली संस्कृती शांतपणें तेवत असलेल्या अखंड नंदादीपाप्रमाणें आहे.** ती जगाचे डोळे आपल्याकडे आकर्षून घेण्यास समर्थ झाली नाहीं तरी तिचें तेज, पावित्र्य व दिव्यत्व शाश्वतस्वरूपाचें आहे. असले क्षणिक नेत्ररंजन करणारे तारगोळे बनवण्यांत पाश्चात्य राष्ट्रें आपली शक्ति निष्कारण खर्च करीत आहेत. त्यांना त्यापासून कांहींच लाभ नाहीं.

राजकीय दृष्ट्या एकराष्ट्रीयत्वाची भावना उत्पन्न करण्यांत जर आपण आपलें सर्व सामर्थ्य खर्च केलें तर आपण अगदीं निर्वीर्य होऊन राहूं. अध्यात्मिक किंवा आत्मिक शक्ति वाढविण्यास आपल्याजवळ कसलेंही साधन उरणार नाहीं. कोणतेंही राष्ट्र आत्मिक सामर्थ्यावरच उत्कर्षशिखरास पोहोंचत असतें. इंग्लंडच्या नाविकदळाशीं स्पर्धा करण्याकरितां किंवा त्याच्याशीं टक्कर देण्याकरितां स्वित्झलंडनें आपलें सर्वत्र कसाला लावून नाविकदळ उभारलें खरें, पण त्याचा काय फायदा झाला? आपल्याजवळ काय होतें नव्हतें तेवढें स्वित्झलंड गमावून बसला.

आपली स्थिति आज जरी निकृष्ट व खालावलेली दिसत असली तरी आपल्यापुढें उज्ज्वल भवितव्य आहे. साधनसामुग्रीची परिपूर्तता असली तरी नैतिक बळापुढें तिची मात्रा चालत नाहीं. नैतिक बळाचाच

नेहमीं विजय होत असतो. फलाकांक्षा न धरतां मनुष्यानें कर्म करीत रहावें. त्या कर्माचें फल प्राप्त झाल्यावांचून रहाणार नाहीं.

तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर ।
असक्तो ह्याचरन् कर्म परमाप्नोति पूरुषः ॥

अशी श्रद्धा ठेवली पाहिजे.

हिंदुस्थान प्राचीन संस्कृतीनें इतका समृद्ध आहे कीं त्याला पाश्चात्य राष्ट्रांकडे संस्कृतीची भिक्षा मागावयास जाण्याचें कारणच नाहीं. उलट पाश्चात्यांनींच पौर्वात्यांकडे हात पसरला पाहिजे. पाश्चिमात्यांचा हिंदुस्थानाशीं जो संबंध आलेला आहे तो केवळ योगायोगानेंच. हिंदुस्थाननें आपल्या सहाय्यासाठीं कांहीं त्यांना निमंत्रण केलें नव्हतें. किंवा हिंदुस्थान भिकारीही झाला नव्हता. आतां मात्र त्यांच्या संसर्गानें हिंदुस्थान भिकारी बनला. त्यांच्या उपजत व्यापारी वृत्तीनें हिंदुस्थानाजवळ जें होतें नव्हतें तें लुटून नेण्यास त्यांनीं मागेंपुढें पाहिलें नाहीं. तथापि पाश्चात्य राष्ट्रांपासून फटकून वागण्याची व स्वातंत्र्याच्या बाण्यानें एकलकोंडे रहाण्याची आमची इच्छा नाहीं. हिंदुस्थान आणि इंग्लंड यांची परस्पर मैत्री असावी, आणि त्यांतच जगाचा उद्धार होणार आहे. मनुष्याचा स्वभावधर्म पृथ्वीच्या पाठीवर सारखाच असल्यामुळें आपणांस निराश होण्याचें कारण नाहीं. पाश्चात्य संस्कृती जेव्हां स्वार्थाच्या हेतूनें दुसऱ्यावर शस्त्र चालवावयाला उद्युक्त होते तेव्हां ती आपलें कबरस्थान आपल्या हातांनीं बांधीत आहे असें स्पष्ट म्हणावयास हरकत नाहीं.

राष्ट्र शब्दाची व्याख्या करतांना आपणांला असें म्हणतां येईल कीं बहुजनसमाजाची संघटित शक्ति म्हणजेच राष्ट्र. स्वतःचें बळ व कार्यक्षमता कमी होऊं नये, यासाठीं राष्ट्राची नेहेमीं धडपड चालू असते. ह्या गोष्टींत मनुष्याची बरीचशी शक्ति निष्कारण खर्च होत असते. मनुष्य आपल्या उच्च ध्येयाकडे लक्ष द्यावयाचें सोडून ह्या अशाश्वत भौतिक गोष्टींत आपलें सामर्थ्य वेंचीत असतो. राष्ट्राची सेवा करणाऱ्याला वाटत असतें कीं,

आपण अत्यंत श्रेष्ठ प्रतीची गोष्ट करीत आहों; आणि राष्ट्रसेवा हीच मनुष्याची इतिकर्तव्यता आहे असा त्याचा वृथा गैरसमज झालेला असतो. त्याच्या या भ्रमामुळें वा मोहामुळें अखिल मानवजातीचें मात्र अनहित होत असतें. वास्तविक पहातां राष्ट्र हें एक निर्जीव यंत्र आहे. ह्या यंत्राची उपासना करण्यासारखा जगांत दुसरा मूर्खपणा व अप्रयोजकपणा नाहीं. मनुष्याची आत्मिक शक्ति आणि बौद्धिक सामर्थ्य यांत महदंतर आहे. आत्मिक शक्तीवर मनुष्य पूर्णत्वाला पोंचतो, तर बौद्धिक सामर्थ्याच्या अभिमानानें त्याचा क्षणोक्षणीं अधःपात होत असतो. राष्ट्ररूपी यंत्राची उत्पत्ति बौद्धिक सामर्थ्यावरच झालेली असल्यामुळें ती किती कमी दर्जाची आहे याचा उलगडा होतो. ज्यांना स्वतःला आपण प्रामाणिक व नेकीचे आहांत असें वाटत असतें त्यांना दुसऱ्यांचे हक्क लुबाडण्यांत किंवा दुसऱ्यांना बुचाडण्यांत कांहीं वाटत नाहीं. कारण त्यांना आपल्या प्रामाणिकपणाचें पाठबळ आपल्या पाठीशीं आहे असें वाटत असतें. त्याचप्रमाणें जे लोक खरे खरे स्वातंत्र्यवादी आहेत तेच दुसऱ्यांना पारतंत्र्यांत ठेवण्यांत कृतकृत्यता मानीत असतात. “The people which loves freedom perpetuates slavery in a large portion of the world with the comfortable feeling of pride of having done its duty.” (Nationalism.)

व्यक्ति ह्या दृष्टीनें जे लोक स्वभावतः वाईट नसतात ते द्रव्य व सत्ता मिळविण्यासाठीं एकत्र झाले म्हणजे ते लोक पक्के धंदेवाईक सत्ताधारी बनतात. त्यांच्याहातून जीं कृत्यें होतात तीं त्यांच्या पूर्वीच्या जीवनक्रमांत स्वप्नांतसुद्धां आली नसतीं, इतकी काळींकुट्ट असतात. साधा मनुष्य धंदेवाईक व्यापारी बनला म्हणजे आपल्या धंद्यासाठीं वाटेल तें बरेंवाईट करण्यास ज्याप्रमाणें मागेंपुढें पहात नाहीं त्याप्रमाणें राष्ट्रांत एकदां राष्ट्रीयत्वाचें वारें संचरलें म्हणजे तें कोणतें कृत्य करण्यास उद्युक्त होईल त्याचा नियम नाहीं. राष्ट्रीयत्व हा एकप्रकारें राष्ट्राचा धंदा होऊन बसतो. आणि धंदा टिकविण्यासाठीं व्यापारी काय काय गोष्टी—अप्रामाणिकपणा, फसवेगिरी, कपटीपणा, असत्यता, ठकबाजी, लफंगेगिरी, इ०—

करीत नाहीं ? ' मधु तिष्ठति जिव्हाग्रे हृदये तु हलाहलम् ' ही व्यापाऱ्याची वृत्ति कोणाच्या परिचयाची नाहीं ? आणि व्यापारी जर राज्यकर्ता सत्ताधीश बनला तर तो आपले गुण शतपटीनें उधळल्या-शिवाय कसा राहील ?

हिंदुस्थानांत राजकीय हेतूनें राज्य करणाऱ्या नोकरशाहीनें राष्ट्रीय-त्वाची कल्पना हिंदी लोकांच्या अंतःकरणांत उत्पन्न केल्यामुळें देशाचें मोठें नुकसान झालें आहे. देशाच्या खऱ्या प्रगतिला प्रतिबंध होऊं लागला आहे. देशांत निरनिराळे पक्ष व निरनिराळ्या संस्था राजकीय स्वायत्तते-साठीं झगडत आहेत. हिंदुस्थानानें आत्मिक साम्राज्यासाठीं धडपड करावी हें त्याच्या अंतिम कल्याणाचें आहे. त्यासाठीं प्रसंगीं हालअपेष्टा, आपत्ति, कष्ट, निराशा, छळ, अपजय इत्यादिकांना तोंड द्यावें लागणार हें निश्चित आहे. तरी आपण नीतिधैर्याच्या सामर्थ्यावर सत्यासाठीं तनमनधनेंकरून झगडत राहिलें पाहिजे; त्यावांचून गत्यंतर नाहीं. आपल्या अंगीं कष्ट सहन करण्याची शक्ति आली पाहिजे. आपलें नैतिक सामर्थ्य वाढलें पाहिजे. ह्याच सामर्थ्यावर आपल्याला आपलें संरक्षण करतां येईल. हिंदुस्थानांतून इंग्रजांनीं आपलें पाऊल काढल्यावर दुसऱ्या राष्ट्रांच्या वशांत हिंदुस्थान पडणार नाहीं इतकें आपण बलिष्ठ व प्रबळ झालें पाहिजे. आपणांला प्रथम स्वाभिमान राखला पाहिजे. जुन्या रूढी आणि जातिभेद या दोन गोष्टी नष्ट केल्याशिवाय हिंदुस्थानचा उद्धार होणार नाहीं.

युरोपांत निरनिराळीं राष्ट्रें दिसतात खरी परंतु वास्तविक पहातां सबंध युरोप हा एकच देश आहे. त्याच्या उलट हिंदुस्थानचा स्थिति आहे. अनेक देश एका देशांत कोंबल्यासारखी हिंदुस्थानची स्थिति झाली आहे. जाति, धर्म, संस्कृति यांच्या विविधतेमुळें व पृथक्‌पणामुळें हिंदुस्थान एकजीव होऊं शकला नाहीं किंवा हिंदुस्थानांत ऐक्य उत्पन्न होऊं शकलें नाहीं. ही गोष्ट प्रामुख्यानें हिंदुस्थानच्या प्रगतीच्या आड आली असें निश्चितपणें म्हणतां येतें. अमेरिका, आस्ट्रेलिया, व युरोप या देशांनीं मूळ रहिवाशांना कायमचे हांकून लावल्यामुळें किंवा त्यांना नामशेष

केल्यामुळें त्या देशांतून दोन संस्कृतींचा लढा उत्पन्न झाला नाहीं. हिंदुस्थानानें जो येईल त्याला आश्रय दिल्यामुळें आणि वसाहतस्वातंत्र्य दिल्यामुळें हिंदी राष्ट्र अनेकांचें आश्रयस्थान बनून राहिलें. पाहुणचाराबद्दल हिंदुस्थानची उगीच ख्याती नाहीं ! प्रत्येकाचा स्वतंत्र सवता सुभा स्थापन झाल्यामुळें ऐक्याला बाध आल्यास नवल काय ?

हिंदी लोकांची कोणत्याही बाबतींतील तटस्थ वृत्ति व अप्रतिकारबुद्धी या जोडगोळीमुळेंच जातिभेदांचा जन्म झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं. आणि ह्याच स्वभाववृत्तीमुळें परकीयांना हिंदुस्थानांत आपलें बूड स्थिर करण्यास संधी मिळाली.

ह्या असंख्य जातिभेदामुळें खरें जीवन नाहींसें झालें आणि जनतेंत आकुंचित वृत्तीचा प्रादुर्भाव होऊं लागला. जुन्या समजुती, जुन्या चाली व जुने विचार यांना उराशीं कवटाळून बसण्यांत भयंकर हानी झाली हें न सांगतांही समजण्याजोगें आहे. विशिष्ट जातींकडे विशिष्ट धंदे सोंपविले गेल्यामुळें चुरस व स्पर्धा यांचा उद्भव झाला. हिंदुस्थानानें आपली वृत्ति अंतर्मुख केल्यास त्याला ही स्थिति भयानक वाटल्यावांचून रहाणार नाहीं.

' Society is the expression of those moral & spiritual aspirations of man which belong to his higher nature अशी समाजाची अंतर्रचना आहे. वासना व विकार यांची तृप्ती करण्याच्या हेतूनें अनेक व्यक्ति एकत्र झाल्या म्हणजे त्या समूहाला समाज ही संज्ञा देतां येत नाहीं. मनुष्याचें जीवित सामान्य पाशवी जीवनव्यापारांहून वरच्या दर्जाचें आहे. तें अध्यात्मिक व नैतिक बंधनांनीं जखडलेलें आहे. आपण जेव्हां राष्ट्रीयत्वाचा टाहो फोडतो त्यावेळीं आपलें जीवन ह्या प्रकारचें नाहीं, निकृष्ट दर्जाचें आहे असा सहजच अर्थ होतो. आपलीं सामाजिक ध्येयें जर अशा वरच्या दर्जाचीं असतील तर जगाचा उद्धार करावयाला आपण समर्थ होऊं अशी कोणालाहि ग्वाही देतां येईल.

जोंपर्यंत आपलें चित्त स्वातंत्र्याच्या वातावरणांत विहार करीत नाहीं तोंपर्यंत आपल्याला राजकीय स्वायत्तता मिळून सुद्धां खरें स्वातंत्र्य मिळालें नाहीं असें स्पष्ट म्हणतां येतें. मनुष्याची वृत्ति परतंत्र असली, त्याचें मन गुलामगिरीच्या कल्पनेनें भारावलेलें असलें म्हणजे त्याला स्वातंत्र्य मिळून न मिळून सारखेंच. म्हणून स्वतंत्र मनोवृत्तीची किंमत राष्ट्रीयत्वापेक्षांही कितीतरी पटीनें अधिक आहे, हें सांगावयास नकोच.

ज्यांना राजकीय स्वातंत्र्य मिळालें ते स्वतंत्र झाले असेंच कांहीं नाहीं. त्यांना अधिकार मिळाला, ते सत्ताधारी बनले इतकेंच. त्यांचे स्वतःचे मनोविकार जोंपर्यंत अनियंत्रित आहेत, त्यांची जोंपर्यंत स्वैर व अनिर्बंध गति चालू आहे तोंपर्यंत ते दास्यमुक्त झाले नाहींत असेंच म्हणणें प्राप्त आहे. पैसा हीच ज्यांना आपल्या आयुष्याची इतिकर्तव्यता वाटते व लक्ष्मीच्या आराधनेंत ज्यांचें जीवन व्यतीत होत असतें ते श्रीमंतांचे व श्रीमंत देशांचे गुलाम होऊन रहात असतात. त्याचप्रमाणें दुसऱ्यांवर अधिराज्य स्थापन करण्याची महत्वाकांक्षा बाळगणारे दुसऱ्यांना आपल्या वर्चस्वाखालीं आणतां आणतां स्वतःचें स्वातंत्र्य व माणुसकी गमावून बसतात. स्वतःला कांहीं व्यक्तित्व व माणुसकी आहे याची त्यांना जाणीवच रहात नाहीं. स्वतंत्र म्हणून गणल्या गेलेल्या देशांत सुद्धां बहुजनसमाजाला कांहीं खरें स्वातंत्र्य मिळालेलें नाहीं. अल्पसंख्यांक सत्ताधारी समाज त्यांना मेंढराप्रमाणें वाटेल तसा वळवीत असतो. स्वातंत्र्य म्हणजे काय आणि स्वायत्तता म्हणजे काय याची त्या बिचाऱ्यांना पुरती तोंडओळख-ही नसल्यामुळें वेसण घातलेल्या बैलाप्रमाणें आपल्याला कोणी खेंचत आहे याची त्यांना जाणीव नसल्यास बिलकूल नवल नाहीं. आपला देश स्वतंत्र आहे, व आपण ज्या कांहीं तरी चळवळी करीत असतो त्या स्वातंत्र्याच्या द्योतक आहेत. एवढ्याच एका भावनेवर ते सौख्य अनुभवीत असतात.

हल्लींच्या कांहीं राष्ट्रनेत्यांची अशी समजूत आहे कीं फार प्राचीन काळापासूनच हिंदुस्थान सांस्कृतिक, सामाजिक व अध्यात्मिक पूर्णावस्थेला

पोंचलेला आहे, आतां फक्त राजकीय स्वातंत्र्य मिळविलें म्हणजे हिंदुस्थानानें उत्कर्षाचें अंतिम शिखर गांठलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. पण ही सर्वथैव चुकीची समजूत आहे. आजची परिस्थिति डोळ्यांआड करून नुसते भूतकाळाचे पोवाडे गात बसण्याची प्रवृत्ति कार्यनाश करणारी आहे.

सामाजिक बाबतींतली आपली दुःस्थिति राजकीय बाबतींत विघातक झाल्याशिवाय रहाणार नाहीं. समाजांतील कांहीं घटकांविषयीं सहानुभूति व समता यांचा अभाव असेल तर राजकीय बाबतींत तो जुलूम व अन्याय होईल. याचा वेळींच विचार केला पाहिजे. सामाजिक व्यवहारांत स्थितिप्रिय व परंपरानिष्ठ असणाऱ्यांना 'राष्ट्रीयत्व' म्हणजे काय हें मुळींच कळलेलें नसतें. त्यांनीं राष्ट्रीयत्वाचा कितीही उच्चैर्घोष केला तरी त्याकडे कोणी शहाणा व समंजस माणूस लक्ष देणार नाहीं. ज्या ठिकाणीं एक मनुष्य दुसऱ्या मनुष्याला पशुपेक्षांही हीन समजून त्याच्याशीं तुच्छतेनें वागतो, ज्या ठिकाणीं असंख्य जातींचा संकर झालेला असला तरी परस्पर रोटीबेटीव्यवहार होत नाहीं व परस्परांबद्दल सहानुभूतीची व दयेची भावना नाहीं, ज्या ठिकाणीं माणुसकी वास करीत नाहीं, त्याठिकाणचे लोक उदात्त ध्येयासाठीं जीव द्यावयाला कधींतरी तयार होतील काय? असल्या सामाजिक जुलमाच्या साम्राज्यांत एकराष्ट्रीयत्व कसें जन्मास येणार?

— —

# प्रकरण नववें

## रवींद्रबाबू आणि राष्ट्रीय आंदोलन

राष्ट्रांत जागृत होऊं लागलेलें नवचैतन्य समूळ नाहिंसें करून टाकण्यासाठीं बंगालची १९०५ मध्यें फाळणी करण्यांत आली, अशी बंगाली जनतेचा साहजिकच खात्री झाल्यामुळें सबंध बंगाल प्रांत एका हाकेसरशीं खडबडून जागा झाला. परदेशी वस्तूंवर बहिष्कार पुकारण्यांत येऊन स्वदेशी चळवळीची द्वाही देशभर फिरविण्यांत आली. विद्यार्थ्यांत व युवकवर्गांत भयंकर असंतोष माजल्यामुळें अत्याचारांच्या बातम्या ऐकूं येऊं लागल्या. धरपकड, शिक्षा, दडपशाही वगैरे गोष्टींनीं आपलें भयंकर विश्वस्वरूप दाखविण्यास सुरवात केली. स्वदेशीच्या चळवळींत रवींद्रनाथांनीं पुष्कळ तऱ्हेनें भाग घेतला. लोकजागृति करण्यासाठीं त्यांनीं व्याख्यानें दिलीं. त्यांचा आवाज इतका मधुर व भाषण इतकें परिणामकारक असें कीं वाटेल तेवढा जनसमाज अगदीं तटस्थ होऊन जाई. त्यांच्या पदांनीं विद्यार्थ्यांत उत्साह व एकप्रकारचा उन्माद उत्पन्न केला. बंकीमचंद्रांचें ‘ वंदे मातरम् ’ हें पद अगदीं पाहिल्यानें जाहीर सभेंत म्हणण्याचें श्रेय रवींद्रबाबूंना मिळालें आहे. आपलें पद राष्ट्रगीत होऊन प्रत्येक हिंदवासीयाच्या जिव्हाग्रीं नाचेल अशी बंकीमचंद्रांना अस्पष्ट सुद्धां कल्पना नसेल ! रवींद्रनाथांनीं तें गीत इतक्या भावपूर्ण व परिणामकारक रीतीनें म्हणून दाखविलें कीं तें ऐकल्याबरोबरच प्रेक्षणगण देहभान विसरून गेला. ह्या गीतांतील स्फूर्ति, तेज, माधुर्य व उत्कटता या गुणांनीं जनसमाज अगदीं मोहून गेला. हें गीत लोकप्रिय होण्याचें जितकें श्रेय बंकीमबाबूंना आहे तितकें जरी नाहीं तरी कांहीं थोड्या अंशानें तें रवींद्रबाबूंनाही दिलें पाहिजे.

रवींद्रबाबू कॉंग्रेसला कधींही येऊन मिळालें नाहींत. ते कुठल्याही अधिवेशनाला हजर राहिले नाहींत. नाहीं म्हणायला १८८६ सालीं कलकत्याला प्रथमच भरलेल्या कॉंग्रेसला ते हजर राहिले होते. त्याच वेळीं त्यांनीं ‘ वंदे मातरम् ’ हें पद प्रथमच जाहीर रीतीनें गाऊन दाखविलें.

१९०५ सालीं ते 'नॅशनल कौन्सिल ऑफ एज्युकेशन' या शिक्षण-संस्थेला येऊन मिळाले, या संस्थेतर्फे त्यांची साहित्यविषयक प्रश्नांवर एक व्याख्यानमाला झाली. हीं व्याख्यानें 'साहित्य' या पुस्तकांत संकलित करण्यांत आलीं आहेत. राष्ट्रीय शाळा आणि राष्ट्रीय कॉलेजें काढण्याला रवींद्रबाबूंनीं पुष्कळ मदत केली आहे. खेडेगांवांतील हस्तकौशल्याचे धंदे पुनरुज्जीवित करण्यासाठीं त्यांनीं पुष्कळ परिश्रम केले. कापड विणण्याचा धंदा खेडोपाडीं पुन्हां सुरू करण्यासाठीं वाटेल तेवढा पैसा खर्च करण्यास त्यांनीं मागेंपुढें पाहिलें नाहीं, पण ह्या खर्चाचें जसें चीज व्हावयास पाहिजे होतें तसें न झाल्यामुळें त्यांची मनोवृत्ति पालटली. म. गांधींची खादीची चळवळ सुरू झाल्यावर त्यांच्या चरख्याला नांवें ठेवण्यांत मात्र रवींद्रबाबूंनीं आपली काव्यशक्ति खर्च केली. जुन्या धंद्यांचें पुनरुज्जीवन करण्याच्या कामीं रवींद्रबाबूंना अपयश झाल्यामुळें चरख्याबद्दल त्यांच्या अंतःकरणांत अप्रीति उत्पन्न झाल्यास नवल नाहीं. १९२२-२३ सालीं रवींद्रनाथ आणि महात्माजी यांच्यामध्यें चरख्याच्या उपयुक्ततेबद्दल झालेला वाद सुप्रसिद्धच आहे.

एके वेळीं सरकारच्या दृष्टीनें 'संशयित' ठरलेल्या लोकांच्या यादींत त्यांचें नांव होतें असें म्हणतात. त्यांच्यावर गुप्त पोलिसांची नजर होती, ही गोष्ट खोटी नाहीं. एकदां रविबाबूंचा एक मित्र एका चोरीची वर्दी देण्यासाठीं पोलिसठाण्यांत गेला. इतक्यांत एक पोलिस कॉन्स्टेबल आंत आला. आणि त्यानें 'रवींद्रनाथ टागोर सी क्लास नंबर बारा' बोलपुरहून कलकत्त्याला आले आहेत. अशी मुख्याधिकाऱ्याला वर्दी दिली. रवींद्रनाथांच्या मित्रादेखतच हा प्रकार घडल्यामुळें ते 'संशयित' आहेत याबद्दल शंका उरली नाहीं. एक गुप्तपोलिस रवींद्रबाबूंच्या शाळेंत विनावेतन काम करण्यास आला. त्याच्या निःस्वार्थतेबद्दल इतर शिक्षकांना त्याच्याबद्दल आदर वाटूं लागला. पण पुढें तो सरकारी हेर आहे असें कळतांच त्याला ताबडतोब हाकून देण्यांत आलें. रवींद्रांनीं लॉर्ड कर्झनच्या दिल्ली दरबारावर सडकून टीका केल्याचें सरकारी अधिकाऱ्यांचें नजरेस येतांच त्याबद्दल त्यांना जाब विचारण्यांत आला.

त्यांच्या पत्रांत कांहीं राजद्रोही वाक्यें आहेत असा त्यांच्यावर आरोप करण्यांत येऊन त्याबद्दल त्यांना ठपकाही देण्यांत आला.

## वंगभंग

१९०५ च्या बंगालफाळणीविरुद्ध जी चळवळ सुरू झाली त्यांत रविबाबूंनीं बराच महत्त्वाचा भाग घेतला. त्यांनीं पुष्कळ लेख लिहिले व अनेक क्षोभजनक भाषणें केलीं. त्यावेळचीं त्यांचीं भाषणें जळजळीत व जहाल होतीं. त्यांत राष्ट्रीयत्वाचें व उत्कट स्वातंत्र्याचें ओज विलसत होतें. 'आमच्या राष्ट्राचें राष्ट्रीयत्व बादशहाच्या इच्छेवर किंवा अनिच्छेवर अवलंबून नाहीं हें ध्यानांत ठेवा. कोणत्याही कायद्यामुळें हिंदुस्थानावरचें आमचें स्वामित्व नष्ट होणार नाहीं. हिंदभूमी ही आमची मातृभूमी व भाग्यभूमी आहे. तिचा कोणालाही अपहार करतां येणार नाहीं.'—असें त्यांनीं एका प्रसंगीं उद्गार काढले. पुढें त्यांना ह्या चळवळीचा व देशभक्तीचा एकदम वीट आला व ते तडक शांतिनिकेतनांत निघून गेले. त्यांनीं अध्यापन, काव्यलेखन व चिंतन यांत आपलें आयुष्य घालवावयाचें ठरविलें. त्यांनीं चळवळींतून आपलें अंग काढून घेतल्यामुळें लोकांनीं त्यांच्यावर टीकेचें काहूर उठविलें, पण आपल्या निश्चयापासून ते यत्किंचितही चळले नाहींत.

रवींद्रांच्या राजकीय चळवळी याप्रमाणें एकदम बंद पडल्या. राष्ट्रीय चळवळींत राजकारणालाच प्राधान्य देण्यांत येतें, समाजकारणाला देण्यांत येत नाहीं याबद्दल त्यांनीं चळवळीवर एकदां खूप टीका केली होती. सामाजिक सुधारणा राजकीय प्रश्नांच्या मानानें कमी महत्वाच्या आहेत कीं काय असा त्यांचा सवाल आहे. रवींद्रबाबूंची राष्ट्रीय दृष्टी सामाजिक स्वरूपाची असल्यामुळें त्यांनीं राजकीय चळवळींना नांवें ठेवल्यास नवल नाहीं महात्मा गांधींची हल्लींची चळवळ नुसती राजकारणालाच वाहिलेली नाहीं. गांधीजींची चळवळ आर्थिक व सामाजिक प्रश्नांवरच मुख्यतः उभारलेली आहे, बंगाल—फाळणीखेरीज त्यांनीं

कोणत्याही राजकीय प्रश्नाला स्पर्श केला नाहीं. ते शांतिनिकेतनांत निघून गेल्यावर लोकांनीं त्यांना ' भ्याड ' ' देशद्रोही ' अशा विशेषणांचा अहेर केला. पण पुढें कित्येक वर्षे ते सार्वजनिक कार्यांपासून पूर्णपणें अलिप्तच राहिले. राजकीय आंदोलनापासून पूर्णपणें निवृत्त होण्याचें कारण त्यांची मनोवृत्ति अलीकडे अध्यात्मप्रवण झाली होती. आत्मानंद कसा मिळवावा याबद्दल त्यांच्या अंतर्मनाची सारखी धडपड चालली होती. त्यांची त्यावेळची मनःस्थिति त्यांच्या एका मित्रानें पुढीलप्रमाणें वर्णन केली आहे.

' Fortunately, the narrow and aggressive lines on which the whole movement was worked out, making Patriotism an end into itself and efficiency the goal of all activities, grew discordant to the poet's growing spiritual life. He suddenly cut himself away from the movement. He sought solitude of Spirit, he sought the universal joy of nature, he sought the hidden springs of Spiritual life. It was then that many of his longer Gitanjali poems were written.' ( Modern Review-Jul. 1917. )

१९१८ मध्यें पंजाबप्रकरणाचा उद्भव होऊन सरकारी अत्याचारांचा, बेबंदशाहीचा व दडपशाहीचा अगदीं कळसच झाला. नोकरशाहीचीं तीं अंगावर शहारे उत्पन्न करणारीं कृत्यें ऐकून ज्याचें रक्त उसळलें नाहीं त्याची माणसांत सुद्धां गणना करतां येणार नाहीं. ह्या प्रकरणाचा प्रत्येक व्यक्तीनें इतका निषेध केला कीं तेव्हांपासून निषेधाच्या बाबतींत नोकरशाही अगदीं निगरगट्ट बनली असें म्हणण्यास हरकत नाहीं. रवींद्रनाथ टागोरांनीं आपला सक्रिय निषेध प्रदर्शित करण्याकरितां आपल्या ' सर ' ह्या पदवीचा त्याग केला व तत्कालीन व्हाईसरॉय लॉर्ड चेम्सफर्ड यांना त्यांनीं त्या आशयाचें खालील पत्र लिहिलें:—

## टागोरांचें व्हाइसरॉयांना पत्र

" पंजाबांतील स्थानिक अस्वस्थतेचें निर्दलन करण्यासाठीं नोकरशाहीनें कडक व जालीम उपायांचा अवलंब केल्यामुळें आमच्या मनाला मोठाच धक्का बसला व ब्रिटिश प्रजाजन या नात्यानें आम्हांला आमच्या असहायतेची अत्यंत तीव्रतेनें जाणीव झाली. त्या दुर्दैवी लोकांना ज्या अमानुष शिक्षा देण्यांत आल्या आणि त्या शिक्षा ज्या पाशवी पद्धतीनें देण्यांत आल्या त्या शिक्षा आणि त्या पद्धति सुधारलेल्या देशांत तरी अगदीं अपूर्व व अतुल आहेत. निःशस्त्र आणि निरपराधी जनतेला अशा अमानुष रीतीनें वागविण्यांत यावें ही गोष्ट सुधारलेलें म्हणविणाऱ्या सरकारला अत्यंत लाजिरवाणी आहे. मनुष्यजातीचा एका क्षणार्धांत निःपात करतां येण्याजोगीं ज्या राष्ट्राजवळ शस्त्रास्त्रें आहेत त्या राष्ट्रानें निःशस्त्र लोकांवर आपलें सामर्थ्य प्रगट करावें अशाप्रकारचें उदाहरण जगाच्या इतिहासांत सांपडणार नाहीं.

आम्हांला हें स्पष्टपणें सांगितलें पाहिजे कीं सरकारच्या ह्या कृत्याचें नैतिक दृष्टीनें किंवा अनिर्वाह्य उपाययोजनेच्या दृष्टीनें मुळींच समर्थन करतां येणार नाहीं. पंजाबांतील आमच्या देशबांधवांना ज्या हालअपेष्टा आपात्ति व अपमान सहन करावे लागले त्यांच्या हकीगती सबंध हिंदुस्थानांत पोहोचूं नयेत म्हणून सरकारनें वर्तमानपत्रांची मुस्कटदाबी केली, तरीही त्या अमानुष कृत्यांच्या बातम्या सबंध देशभर पसरावयास वेळ लागला नाहीं. त्या बातम्या ऐकल्यामुळें देशांत क्रोधाच्या आणि क्षोभाच्या ऊर्मी उसळूं लागल्या, परंतु सरकारनें त्यांकडे तिळमात्रही लक्ष दिलें नाहीं. हिंदी जनतेला आपण योग्य ते धडे शिकवीत आहोंत अशा दर्पभरानें आमच्या राज्यकर्त्यांनीं स्वतःची पाठ थोपटून घेतली असेल !

नोकरशाहीच्या अत्याचारी दुष्कृत्यांचीं अँग्लोइंडियन वर्तमानपत्रांनीं मोठ्या बेशरमपणानें प्रशंसा केली आणि अन्यायाला दडपून टाकून सरकारचें अभिनंदन करण्याची दुष्टपणाची कामगिरी त्यांनीं पार पाडली.

आमच्या विनंत्या व अर्ज निष्फळ आहेत आणि सूडाच्या भावनेनें

नोकरशाहीच्या मुत्सद्देगिरीचें दिवाळें निघालें आहे हें आम्ही जाणून आहों. शक्तिसंपन्न सरकारनें मनाचा मोठेपणा दाखवून आपल्या अन्यायांचें परिमार्जन केलें नाहीं तरी ते अन्याय जगापुढें मांडून आणि क्षुब्ध झालेल्या जनतेच्या वतीनें निषेध प्रदर्शन करून मला माझें कर्तव्य केलें पाहिजे. हें करीत असतांना जे परिणाम मला भोगावे लागतील त्यांना तोंड देण्यास मी केव्हांही सज्ज आहे. आमची सर्व बाजूनें मानखंडना होत असतां अशीं सन्मानचिन्हें धारण करणें हें अत्यंत लज्जास्पद व गर्हणीय आहे. मनुष्यत्वालाही अपात्र अशी ज्यांची अवहेलना केली जात आहे आणि ज्यांचा अत्यंत पाशवी छळ होत आहे त्या माझ्या देशबंधूंच्या शेजारीं पदव्या नसलेला एक सामान्य हिंदी नागरिक या नात्यानें उभें राहण्यांत मला भूषण वाटतें. मला असल्या लज्जायुक्त व नामुष्कीच्या मानसन्मानांची मुळींच हांव नाहीं. ह्याच कारणास्तव मला दिलेली पदवी मला अत्यंत दिलगिरीनें परत करावी लागत आहे, तिचा स्वीकार होईल अशी आशा आहे. ''

टागोरांना ' सर ' ह्या पदवीचा लोभही नव्हता आणि आनंदही नव्हता. पण ती पदवी परत करतांना मात्र त्यांना समाधान वाटलें. ब्रिटिश सरकारविषयीं त्यांचा जो उत्तम ग्रह झालेला होता तो मात्र ह्या पंजाबप्रकरणामुळें पार बदलून गेला. त्यांचे अनेक ब्रिटिश मित्र आहेत आणि त्यांच्या मैत्रीबद्दल रविबाबूंना अभिमानही वाटतो पण पंजाबप्रकरणामुळें त्यांच्या अंतरंगांत विलक्षण खळबळ उडाली. त्यांनीं ठिक ठिकाणीं त्या विषयावर भाषणें करून निषेध प्रदर्शित केला.

महात्मा गांधींची असहकारितेची चळवळ सुरू होऊन कौन्सिल बहिष्काराच्या कार्यक्रमाला प्रारंभ झाला. रवींद्रबाबूंना हा बहिष्काराचा कार्यक्रम मुळींच पसंत नव्हता. त्यांनीं ह्या चळवळींत थोडाबहुत भाग घ्यावा अशी कै. देशबंधू दास यांनीं खटपट केली. पण दासबाबूंचें रवींद्रनाथांचें मन वळविण्याचे प्रयत्न फुकट गेले. रविबाबूंना निःशस्त्र चळवळ पसंत होती मग त्यांनीं महात्माजींच्या असहकारितेच्या कोणत्याच कार्यक्रमांत भाग कां घेऊं नये याचें जनतेला कोडें पडलें.

## रवींद्रनाथ आणि राष्ट्रीय आंदोलन

रवींद्रनाथांची राजकीय मतें समजून घेण्यासाठीं १९२२ सालीं एका गुजराथी कवीनें त्यांना उद्देशून एक अनावृत पत्र प्रसिद्ध केलें. त्या पत्राला रविबाबूंनीं जें उत्तर दिलें आहे त्यांत त्यांचें अहिंसेचें तत्त्वज्ञान समाविष्ट झालें असल्यामुळें तें पत्र महत्वाचें आहे. त्या पत्रांतील महत्वाचा भाग पुढीलप्रमाणें आहेः—

" जगांतील सर्व राज्ययंत्रांची उभारणी पाशवी शक्तीवर झालेली आहे अशा संघटित पाशवी शक्तीला तोंड देण्याचें सामर्थ्य अहिंसेत आहे असा माझा दृढ विश्वास आहे. पण प्रत्येक नैतिक तत्त्वाप्रमाणें अहिंसा ही अंतर्हृदयांतून उद्भूत झाली असली पाहिजे. दुसऱ्याच्या उपदेशानें उत्पन्न झालेली अहिंसा तात्पुरत्या स्वरूपाची असल्यामुळें खरी परिणामकारक नसते. जगांतील महानुभाव सत्पुरुषांनीं क्षमा, प्रेम व अहिंसा यांची जी शिकवण दिलेली आहे ती राजकीय सत्तेच्या तात्पुरत्या लाभासाठीं दिलेली नाहीं; अध्यात्मिक पूर्णावस्था प्राप्त करून घेण्यासाठीं ती शिकवण देण्यांत आलेली आहे. ज्यांनीं आतांपर्यंत स्वार्थपरायणतेचाच मार्ग आक्रमण केला आहे त्यांच्या आयुष्यांत ही शिकवणूक कितपत फलद्रूप होणार याची शंका आहे. कांहीं व्यावहारिक व लौकिक लाभाच्या इच्छेनें लोक आपले मनोविकार कांहीं कालपर्यंत ताब्यांत ठेवूं शकतात, ही गोष्ट खरी आहे. परंतु निरनिराळ्या संस्कृतींचे लोक अनत्याचाराचें तत्त्व यथार्थतेनें अमलांत आणूं शकतील असें मला वाटत नाहीं. आफ्रिकेंतील स्थिति निराळी होती, हिंदुस्थानची निराळी आहे. मला माझ्या स्वतःच्या सामर्थ्याची जाणीव असल्यामुळें स्वतःच्या शक्तीबाहेरचें काम मी कधींही करणार नाहीं, माझ्या व्यवसायापलीकडे मी कशाकडेही लक्ष देणार नाहीं. "

देशांतील राजकीय अस्वस्थतेचा परिणाम त्यांच्या काव्यावर झाल्यावांचून राहिला नाहीं. देशांतील चळवळीमुळें त्यांच्या मनाची शांतता नष्ट झाली व माझें काव्य आतां मृत्युपंथाला लागलें आहे,' असे ही एकदां त्यांनीं उद्गार काढले.

रवींद्रनाथांना राजकारणांत ओढण्याचे पुष्कळांनीं प्रयत्न केले. महात्मा गांधी स्वतः त्यांना भेटावयास गेले. दुसरें कांहीं केलें नाहीं तरी कविवर्यांनीं दररोज निदान अर्धातास चरखा चालवावा अशी गांधीजींनीं त्यांना सूचना केली. पण रवींद्रनाथांनीं गांधींच्या चरख्याव पुष्कळ टिका केली आणि अखेरीस त्याचा उपहासही करण्यास मागेंपुढें पाहिलें नाहीं. चरख्यानें स्वराज्य मिळविण्याची कल्पना हास्यास्पद आहे आणि समजा, चरख्यानें स्वराज्य मिळत असलें तरी तें मला नको आहे असे रविबाबूंनीं शेवटीं उद्गार काढले.

राजकीय क्षुब्धतेचा आपल्या विद्यालयाला संपर्क लागूं नये याबद्दल रवींद्रबाबू फार दक्ष असतात. विद्यार्थ्यांना राष्ट्रीय त्वाच्या कल्पनेचा संसर्ग-सुद्धां होऊं नये आणि त्यांचें शिक्षण पूर्णपणें सांस्कृतिक पायावर व्हावें अशी त्यांची नेहेमीं खटपट चालू असते. भारतीयेतर विद्वानांनीं आपल्या विद्यालयाला भेट देऊन सांस्कृतिक दळणवळण सुरूं करावें अशी त्यांची मनापासून इच्छा आहे. गेल्या वर्षाच्या स्वातंत्र्ययुद्धावर त्यांनीं खालील विचार प्रकट केले आहेत:—

"महात्मा गांधींसारख्या सामर्थ्यवान पुढाऱ्याच्या नेतृत्वाखालीं माझे देशबांधव स्वातंत्र्यासाठीं युद्धोन्मुख झाले आहेत ही गोष्ट मला अभिमानास्पद वाटते. आणि त्यांतल्या त्यांत विशेष आनंदाची व अभि-मानाची गोष्ट ही आहे कीं त्यांनीं पाश्चात्य राष्ट्राप्रमाणें सशस्त्रयुद्धाचा अंगीकार न करतां पूर्णपणें अहिंसात्मक अनत्याचारी व्रत आरंभलें आहे. त्याग, नीतिधैर्य आणि अहिंसा या अध्यात्मिक शक्तीमुळें त्यांनीं जगांत आपलें श्रेष्ठत्व संपादन केलें आहे. कोणत्याही परिस्थितींत आपली मनो-वृत्ति क्षुब्ध होऊं न देतां माझ्या देशबांधवांनीं जर हें अहिंसेचें व्रत अत्यंत तीव्रतेनें व कडकपणानें पाळलें तर ते स्वातंत्र्य संपादन करतील यांत मला तिळमात्र संदेह वाटत नाहीं. आपल्या अहिंसेच्या उदात्त तत्वापासून जर ते यत्किंचितही च्युत झाले नाहींत तर त्यांनीं आपलें ध्येय साध्य केलेंच म्हणून समजावें. 'I have no doubt that if

our countrymen can keep fast to this heroism of nonviolence in spite of volent provocation, they will have no difficulty in establishing freedom, which is already theirs in so far as they are true to their central ideal.'

हिंदुस्थानानें आपला स्वातंत्र्याचा लढा अध्यात्मिकतेच्या पायावर उभारला आहे ही गोष्ट हिंदुस्थानची श्रेष्ठता पटविण्यास पुरेशी आहे. राजकारणांतसुद्धां नैतिक शक्ती प्रभावी ठरूं शकते, आणि अध्यात्मिकतेचा राजकारणावरही वरचष्मा बसूं शकतो, इतकेंच नव्हें तर राजकारणांत अध्यात्मिकतेचें श्रेष्ठत्व कबूल केलें जाते ही गोष्ट हिंदुस्थानांतच प्रथम निदर्शनास आली आहे. आजपर्यंतच्या जगाच्या इतिहासांत अशी गोष्ट ऐकिवांत नाहीं. ब्रिटिश मुत्सद्यांकडून हिंदुस्थानच्या बाबतींत कांहीं मिळेल अशी आशा करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. येत्या गोलमेजपरिषदेंतून जी फलनिष्पत्ती होईल ती एवढीच कीं हिंदुस्थानच्या आत्मिकशक्तीचें जगास प्रत्यंतर येईल. ही परिषद हिंदुस्थान व इंग्लंड यांच्या हितसंबंधापुरतीच मर्यादित नाहीं, सबंध जग तिच्याकडे आपले डोळे लावून बसलें आहे. त्या परिषदेचा परिणाम जागतिक राजकारणावर झाल्यावांचून राहणार नाहीं.''

रवींद्रबाबूंचे हे उद्गार नोव्हेंबर १९३० ला भरलेल्या गोलमेज परिषदेपूर्वींचें असले तरी आजच्या परिस्थितींत ही ते तितक्याच समर्पकतेनें लागूं पडतात, यांतच कवीचा द्रष्टेपणा दिसून येतो.

## रवींद्रनाथ व हिजलीचा गोळीबार

बंगालप्रांतांत हिजली येथें संशयावरून डांबून ठेवलेल्या राजबंद्यांवर २४।९।३१ रोजीं गोळीबार करण्यांत आला. हा गोळीबार इतका दुष्टपणानें व निर्दयतेनें करण्यांत आला कीं त्यांत एक राजबंदी मरण पावला आणि कित्येक जखमी झाले. निःशस्त्र व निरपराधी कैद्यांवर गोळ्या चालविण्याचें नोकरशाहीचें भ्याडपणाचें कृत्य पाहून अखिल जनतेंत क्षोभाचा वणवा पेटला. चहूंबाजूंनीं निषेधप्रदर्शक सभा होऊन दुर्बळ

जनतेनें निषेधाचें निर्बळ हत्यार घेऊन नोकरशाहीवर हल्ले चढविण्यास सुरुवात केली. राजकारणापासून निवृत्त झालेल्या साधुपुरुषांनासुद्धां हिजलीनें खडबडून जागें केलें. ' हिजलीच्या भयंकर अत्याचारानें शांति-निकेतनाच्या मर्यादित क्षेत्रांत विश्वप्रेमाचा आणि शांतीचा शोध करणाऱ्या कविवर्य रवींद्रनाथांच्या अतिसंस्कृतिसंपन्न व म्हणूनच राजकारणभीरू हृदयालाही धक्का बसला. देशांत भयंकर अत्याचार होत आहेत याची त्यांना जाणिव झाली व शांतिनिकेतनाच्या मायावी शांतींतून भोंवतालीं धगधगीत पेटलेल्या वणव्याच्या सत्यसृष्टींत पाऊल टाकून सरकारी अत्याचारांचा निषेध करणें आपलें कर्तव्य आहे असें त्यांना वाटलें. ' व ता. २६।९।३१ रोजीं कलकत्त्याच्या टाऊन–हॉलमध्यें भरलेल्या जाहीरसभेचें अध्यक्षस्थान स्वीकारून त्यांनीं जें भाषण केलें तें अत्यंत जळजळीत आहे. त्या भाषणांत ते म्हणतातः—

" सुरवातीला मला कबूल केलें पाहिजे कीं, आम्हांला सोसाव्या लागणाऱ्या अत्यंत कठीण दुःखाचा उपयोग राजकिय बाबीकडे करून घ्यावा, यामध्यें मला कधींही सुख वाटत नाहीं. हिजली येथील गोळीबाराचा हल्ला हा दुःखपर्यवसायी, पाशवी शक्तीचा भित्रेपणा दर्शविणारा असा आहे, म्हणून मानवी छळाकरितां तरी आपलें लक्ष तिकडे वेधावयास पाहिजे. जाहीर सभेंत भाग घेणें हें माझ्या शरीरप्रकृतीला अपायकारक व मनाला अस्वास्थ्यकारक आहे. परंतु नेमलेल्या रक्षकांच्या प्राणघातक हल्ल्यामुळें ज्यांचा करुणस्वर कायमचा बंद केला गेला आहे अशा बळी गेलेल्यांच्या आरोळ्याकडे मला दुर्लक्ष करतां येईना.

जेव्हां मला असें आढळून येतें कीं, लोकमताला धाब्यावर बसवून अशा थरकांप उत्पन्न करणाऱ्या कृतीकडे दुर्लक्ष केलें जातें तेव्हा माझी अशी खात्री होते कीं, हिंदुस्थानांतील ब्रिटिशांच्या नैतिक सत्तेला अधोगति लागल्याचें हें एक स्पष्ट चिन्हच आहे.त्यावरून असल्या अत्याचाराची मालिकाच सुरूं होण्याचें आपल्या काळ्याकुट्ट नशीबीं आहे असें दिसतें. ज्यावेळीं असहाय लोकांची मानखंडना करण्यांत येते व वेळीं अवेळीं

त्यांना सतावून सोडण्यांत येते तेव्हां या कृत्यास जबाबदार असणारांची अधोगति होत आहे असें दिसतें व त्यामुळें ते सुधारलेल्या राजसत्तेचा पाया उखडून टाकण्यास अंधपणें मदतच करतात.

माझ्या देशबांधवांतर्फे मी येथें सूचना देण्यास आलों आहे. ती अशी कीं, स्वातंत्र्याची लाट दाबून टाकण्याकरितां विपुल साधनसंपत्तीनें सरकार कितीही सज्ज झालें तरी सरकारला केव्हांही न्यायाला तुडवितां येणार नाहीं. किंवा क्षोभाच्या पांघरूणाखालीं अचल सत्यनिष्ठेचा त्याग करतां येणार नाहीं. आमच्या लोकांना अन्यायाचा प्रतिकार करण्याचें शारीरिक सामर्थ्य नसेल पण या कृत्याचा नैतिक प्रतिषेध करण्याबद्दल त्यांना कोणतीही शक्ति आड येणार नाहीं. आणि या लोकांचे निर्णयावरच प्रत्येक सरकारनें—मग तें कितीही परकीय असो—आपलें अस्तित्व अवलंबून आहे हें लक्षांत ठेवावें.

उद्बोधक शब्दांत आपल्या मनोवृत्ती प्रगट करण्याचा निरर्थक प्रयत्न करावा अशी माझी मुळींच इच्छा नाहीं. ही जी प्रत्यक्ष गोष्ट घडली आहे तिच्या जाणीवेपेक्षां प्रतिषेधाचे कोणतेही शब्द प्रतिकाराचें शिखर गाठूं शकणार नाहींत आपणांस झालेल्या अत्यंत दुःखामुळें गंभीर अशी शांति आपणांस मिळो कीं, जी शांति असें दुःख मूलतः कसें नष्ट करावें हें सुचवील व आपल्या बंधूंचे हुतात्मत्वास उत्तर देण्याबद्दल जो आत्मयज्ञ यापुढें करावा लागेल व जीं दुःखें यापुढें आपणांस सोसावीं लागतील त्याबद्दल आपल्यास तयार करील !

सारांश, दुःखानें तप्त झालेल्या कुटुंबांना मी सहानुभूति दाखवितों व त्यांना असें आश्वासन देतों कीं जें क्रूरपणाचें दुःख सोसण्याचें त्यांच्या नशीबीं आलें आहे त्याची जाणीव लोकांच्या दुःखतप्त स्मृतिपटलांतून जाणार नाहीं व ती स्मृति मृतांचें मंदिरांत पवित्र दिव्याप्रमाणें तेवत राहील !"

## कायदेभंगाच्या चळवळीचें दुसरें मन्वंतर

१९३० मध्यें जी कायदेभंगाची चळवळ सुरू झाली ती १९३१ च्या

मार्चमध्यें तात्पुरती तहकूब ठेवण्यांत आली. मध्यंतरीं महात्मा गांधी हिंदुस्थानचें स्वातंत्र्याचें ध्येय ब्रिटिश जनतेपुढें मांडण्याकरितां गोलमेज परिषदेला गेले, परंतु परिषदेंतून कांहींच निष्पन्न न झाल्यामुळें त्यांचें उद्दिष्ट तडीस न गेल्यास नवल नव्हतें. तथापि त्यांच्या जाण्यानें विलायतेंत व इतरत्र सामान्य जनतेवर पुष्कळच परिणाम झाला. गांधीजी विलायतेंत असतांना हिंदुस्थानांत नोकरशाहीनें गांधी-आयर्विन कराराला धाब्यावर बसवून दडपशाहीचें रणशिंग फुंकलें होतें. बंगाल्यांत व संयुक्तप्रांतांत जुलमी वटहुकूम काढून जनतेस व शेतकऱ्यांस चिरडून टाकण्यास नोकरशाही सज्ज झाली होती. गांधीजी २८।१२।३१ रोजीं विलायतेहून परत आले व त्यांनीं देशांत शांतता प्रस्थापित करण्याचे उद्देशानें राजप्रतिनिधीची मुलाखत मागितली. गांधीजींची मागणी अत्यंत बेपर्वाईनें धुडकावून लावण्यांत आली व लागलींच त्यांना ४।१।३२ रोजीं अटकही झाली. हिंदुस्थानच्या एकमेव लोकनायकाला अशा रीतीनें बेमुदत कारागृहांत डांबून ठेवण्यांत आलें. महात्मा गांधींना अटक झाल्यावर हिंदी चळवळीनें वणव्याप्रमाणें पेट घेतला. कायदेभंगाच्या चळवळीचें दुसरें मन्वंतर सुरू झालें.

## रवींद्रनाथ व गांधीजींची अटक

महात्माजींना अटक झाल्याचें ऐकून रवींद्रनाथांच्या मनावर विशेष परिणाम झाल्याशिवाय राहिला नाहीं. एका वर्तमानपत्राच्या प्रतिनिधीला मुलाखत देतांना ते म्हणाले:—

" नोकरशाहीबरोबर एकंदर परिस्थितीची वाटाघाट करण्याची संधी मिळण्यापूर्वीच महात्माजींना अटक करण्यांत आली. यावरून असें स्पष्ट दिसतें कीं हिंदुस्थानचें भवितव्य ज्या दोन पक्षांवर अवलंबून आहे त्यांपैकीं लोकपक्षाला सहज धाब्यावर बसवितां येईल अशी नोकरशाहीची कल्पना आहे. तथापि आपला लोकपक्ष सरकारपेक्षां अधिक महत्वाचा आहे—सर्वांत महत्वाचा आहे हें आपण जगाला दाखविलें पाहिजे.

ब्रिटिश सरकार हें आकस्मिक घटनेनें हिंदुस्थानावर राज्य करीत आहे इतकेंच. त्यांच्यापेक्षां आपण शतपट श्रेष्ठ आहों. परंतु आपण आपलें डोकें शांत न ठेवतां कांहीं तरी अविचाराचें कृत्य केलें तर आपण ही आलेली मोठी संधी गमावून बसूं. निराशेनेंच आपल्या शक्तीला गाढ स्थैर्य येईल; भावनोद्रेकाच्या भरांत ह्या शक्तीचा क्षय न होतां ती अधिकच कार्यक्षम बनते.

The primitive lawlessness of our lawmakers should forcibly awaken us to ultimate salvation in love which owns no defeat in the face of power which barricades itself with indiscriminate suspicion that it is blind panic that cannot be defined.

ह्या वेळीं आपण आपली जबाबदारी विसरतां कामा नये व सर्व मनुष्यजातीकडे गर्वभरानें पहाणाऱ्या पाशवी शक्तीपेक्षां आपण नैतिक दृष्टीनें श्रेष्ठ आहों हें जगाला पटवून दिलें पाहिजे. ''

---

# प्रकरण दहावें

## गांधी व टागोर

आज हिंदुस्थानाबाहेरील जगास हिंदुस्थानाच्या अध्यात्मिक संस्कृतीची ओळख पटवून देण्याचें महत्कार्य ज्यांनीं अंगिकारलें आहे अशा महानुभावी पुरुषश्रेष्ठांत महात्मा गांधी व डॉ. रवींद्रनाथ टागोर यांचीं नांवें प्रामुख्यानें घेतां येतील. अंतर्राष्ट्रीय कीर्तीच्या थोर व्यक्ति हिंदुस्थानांत नाहींत असें नाहीं. चंद्रशेखर रामन्, जगदीशचंद्र बोस, सरोजिनी नायडू, मानवेंद्रनाथ रॉय यांचीं नांवें निरानिराळ्या कारणांनीं विश्वविख्यात असलीं तरी गांधी आणि टागोर यांनीं सबंध विश्वाचें हृदय आपल्याकडे आकर्षून घेतलें आहे. नवीन तत्त्वज्ञान निर्माण करून विचारसृष्टींत क्रांती करणारे महापुरुष म्हणून गांधी व टागोर हीं नांवें चिरंजीव होऊन रहातील यांत शंका नाहीं. गांधींनीं आपल्या विशिष्ट आचारविचारांनीं विचारवंतांच्या विचारसृष्टींत अभूतपूर्व क्रांति घडवून आणली व सत्याग्रहाचें आपलें अपूर्व तत्त्वज्ञान जगापुढें मांडलें यांतच त्यांच्या विश्वकीर्तीचें रहस्य आहे. टागोरांनीं कल्पनासाम्राज्यांत राहून कल्पवृक्षाखालीं सदैव विहार करणाऱ्या कविपुंगवांना नूतन कल्पनासृष्टी बहाल करून सृष्टीनिर्मात्याची कीर्ति संपादन केली व आपलें नांव अजरामर करून ठेवलें. विश्वधर्माचा व विश्वबंधुत्वाचा उच्चैर्घोष करून विश्वैक्याचें तत्त्वज्ञान त्यांनीं जगापुढें मांडलें. गांधी व टागोर यांनीं विश्वशांती व विश्वप्रेम हें जें आपल्या आयुष्याचें ध्येय ठेवलें आहे, त्यामुळेंच दोघांचीं नांवें एकमेकांशीं निगडित झालीं आहेत. ह्या प्रकरणांत ह्या दोन महापुरुषांची तुलना करून त्यांची परस्परांविषयींची मनोवृत्ति मांडण्याचें ठरविलें आहे. दोघांच्या जीवितकार्याचा एकसमयावच्छेदेंकरून परिचय होण्यास हें प्रकरण उपयुक्त होईल अशी आशा आहे.

, सत्य, नीति आणि अहिंसा असा महात्माजींचा त्रिगुणात्मक धर्म आहे. ह्याच धर्माच्या आधारावर त्यांचें राजकारण उभारलेलें आहे. महाभयंकर

सर्पानें विळखा घातल्याप्रमाणें हिंदी जनतेची स्थिती झाली असल्यामुळें महात्माजींना ' अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजितः ' या न्यायानें निरुपायानें व अगतिकत्वानें राजकारणांत पडावें लागलें असलें तरी त्यांची मूळची अध्यात्मप्रधान वृत्ति व विश्वकल्याणाची व्यापक दृष्टी यांचा लोप झाला नाहीं. त्यांचें राजकारण अहिंसामूलक सत्यधर्मावर अधिष्ठित झालें असून तें अंतःशुद्धीच्या पायावर उभारलेलें आहे. धर्म आणि राजकारण यांचा समन्वय साधणारा हा महात्मा 'वेश्यांगनेव अनेकरूपा' अशा राजनीतीला नैतिकदृष्ट्या वरच्या दर्जाला चढवीत आहे व एकरूपतेच्या सांच्यांत बसवीत आहे, हें दृश्य त्यांच्या महानुभावित्वाची प्रतीति आणून देत नाहीं काय ? वास्तविक राजकारण हें महात्माजींचें जीवितध्येय नाहीं. मानवजातीचा अध्यात्मिक उत्कर्ष साधणें हीच त्यांची इतिकर्तव्यता आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. मनुष्याचा अधःपात करावयास कारणीभूत होणाऱ्या असत्य, हिंसा, आणि अन्याय या दुर्गुणांच्या प्रतिकारार्थ म्हणून महात्माजींनीं हिंदी राजकारणाचें पुढारीपण पत्करलें आहे.

विश्वधर्म किंवा शांतिधर्म हा गांधीजींचा धर्म आहे. त्यांचा धर्म सर्वांस जगाला परिपालन करतां येण्यासारखा आहे. हिंदुस्थानाला स्वातंत्र्य प्राप्त झालें तरी गांधीजींचें जीवितकार्य पूर्ववत् चालूंच राहील. आणि म्हणून त्यांना ' जगद्गुरु ' म्हणण्यास मुळींच हरकत नाहीं. निर्भयता हें गांधीजींच्या शिकवणुकीचें आदितत्त्व आहे. सत्याग्रहशस्त्राच्या सामर्थ्यामुळें गांधींनीं जनतेच्या अंतःकरणांत निर्भयता उत्पन्न केली व आत्मविश्वास जागृत केला. गांधीजींना पाहून दधीचि ऋषीची आठवण होते. सर्वस्वार्पणच काय पण आत्मबलिदान करावयाला उद्युक्त झालेल्या महात्म्याच्या थोरवीचें कोण वर्णन करूं शकेल ?

" हिंदुस्थानांत नांव घेण्यासारखे असे दोन महापुरुष आज अस्तित्वांत आहेत. एक रवींद्रनाथ टागोर आणि दुसरे महात्मा गांधी. मनुष्याच्या इतिकर्तव्यतेसंबंधीं प्राचीन ग्रीकलोकांच्या कल्पना रवींद्रनाथ यांच्या ठिकाणीं अवतरल्या असून त्याच बाबतींतल्या येशू ख्रिस्ताच्या कल्पनांचें

मूर्तरूप महात्मा गांधी हे होत. रवींद्रनाथ आपणांस प्लेटोची आठवण करून देतात. ज्ञान, काव्य आणि अतींद्रिय ज्ञान यांचा एकत्र परिपाक रवींद्रनाथांच्या ठिकाणीं आहे. आपल्या काव्याच्या द्वारें उदार आणि उदात्त विचार प्रगट करून अखेरच्या साध्याबद्दल वाचकांच्या मनांत ते उत्साह उत्पन्न करतात. काव्याच्या माधुरीनें वाचकांचीं अंतःकरणें ते वश करून घेतात. आज साऱ्या बंगाल्यांत अलौकिक बुद्धिमान पुरुषांत त्यांची गणना आहे. कल्पनाअवकाशाच्या शुद्ध वातावरणांतून खालीं कधीं उतरूंच नये, अशा प्रकारचा आपला जीवनक्रम आंखण्याचा यत्न ते नेहेमीं करीत असतात. प्रचंड वादळ होऊन धुळीनें दिशा धुंद झाल्या आहेत आणि वाऱ्याच्या झोताबरोबर शुष्क पर्णावली इतस्ततः गिरक्या खाऊं लागली आहे, अशा वेळीं एकादा मनुष्य निर्वातस्थळाचा आश्रय ज्याप्रमाणें मोठ्या औत्सुक्यानें करीत असतो, त्याचप्रमाणें नाना मतांचा आणि पंथांचा गलबला दूर ठेवून स्वतःच्या कल्पनावकाशाच्या निर्भय किल्ल्याचा आश्रय टागोर नेहेमीं करीत असतात.

गांधी याहून भिन्नवृत्तीचे मनुष्य आहेत. सामान्य जनतेच्या अंतःकरणाचा ठाव काढणारा त्यांच्या तोडीचा पुरुष आजवर दुसरा कोणी झाला नाहीं. ते सामान्यांतले सामान्य आहेत.

लोकांचें पुढारीपण करावें, हा हक्क त्यांना जन्मतःच प्राप्त झालेला आहे. ते केवळ प्रेममूर्ति असल्यामुळें आपल्या चैतन्यसामर्थ्यानें दगडाचें ही अंतःकरण ते वश करूं शकतात. लक्षावधि जनतेवर सहज लीलेनें ते अंमल गाजवूं शकतात. ज्या तत्त्वांचें ते प्रतिपादन करतात त्यांचें मूर्तिमंत अधिष्ठान त्यांच्या ठिकाणीं आहे. आणि या तत्त्वांचें सौंदर्य आंधळ्यालाही दिसावें इतकें तें उज्वल आहे. काया, वाचा आणि मन यांच्या कार्याची एकरूपता गांधींच्या ठिकाणीं आहे म्हणून महात्मा हें उपपद त्यांना शोभणारें आहे. विशुद्ध कल्पनांच्या निरामय वातावरणांत परिभ्रमण करीत असतांही ज्याचे पाय जमीन सोडीत नाहींत अशी ही अद्वितीय व्यक्ति आहे. अत्युच्च कोटीचें साध्य आपणांस साधावयाचें आहे, या सुखस्वप्नांत वावरत असतांही त्यांचे हात निरंतर कार्यरत अस-

तात. स्वर्गाचें साम्राज्य ज्याच्या नजरेला सदोदित दिसतें असा हा अलौकिक द्रष्टा आहे. '' ('पुण्यश्लोक' )

फ्रान्समधील जगप्रसिद्ध ग्रंथकार रोमेन रोलंड यांचे पुढील उद्गार यथार्थ नाहींत काय ?

" O Togore ! Oh Gandhi ! Rivers of India, who like the Indus and the Ganges, encircle in your double embrace the East and the West the latter Mahatma master of Selfsacrifice and of heroic action- the former a vast dream of light, both issuing from God Himself, on this world tilled by the ploughshare of hate, scatter, scatter thy seeds ! "

' टागोर आणि गांधी ! भारतवर्षांतील दोन मुख्य नद्या ज्या सिंधु व गंगा त्यांच्याशीं या दोघां थोर पुरुषांची तुलना करण्यास हरकत नाहीं. सिंधु व गंगा या दोन नद्यांनीं ज्याप्रमाणें पूर्वपश्चिमेकडून हिंदुस्थान देश आपल्या दुहेरी बाहुपाशाच्या आलिंगनामध्यें धरला आहे, त्याप्रमाणें या दोघां–महात्मा व कवींनीं पूर्व व पश्चिम या दोन्ही दिशांना आपल्या विचारसरणीनें कवटाळून टाकलें आहे. महात्माजी हे स्वार्थत्यागाचे व वैराग्याचे मूर्तिमंत पुतळे असून शिवाय धैर्यशाली कर्तबगारीचे ते पुरस्कर्ते आहेत. आणि कविश्रेष्ठ टागोर हे स्वप्नसृष्टींत दृग्गोचर होणाऱ्या किंवा भासमान होणाऱ्या दिव्य प्रकाशाचे सागर आहेत. दोघांच्या विचारसरणीचा उगम प्रत्यक्ष अंतःस्फूर्तीपासूनच झालेला आहे. तरी हे दोघे महापुरुष व प्रतिभाशाली तत्त्ववेत्ते जगाला मार्गदर्शक होऊन द्वेषबुद्धिनें किंवा अमानुष प्रवृत्तीच्या मत्सरबुद्धीनें विदीर्ण झालेल्या ह्या जगावर परमेश्वरी कृपेचा व शांतीचा वर्षाव या दोघां महाभागांकडून होवो अशी मी प्रार्थना करतों. ''

## दोघांमधील मतभेद

महात्माजींचा असहकारितेचा कार्यक्रम रवींद्रनाथांना पसंत पडला

नाहीं. शालाकॉलेजांवर किंवा पाश्चात्य विद्येवर बहिष्कार घालून व पाश्चात्यांच्या वाङ्मयाचें किंवा संस्कृतीचें ज्ञान आपल्या तरुण पिढीस होतें तें बंद पाडून केवळ चरखा, खादी व स्वदेशीचा प्रसार यांच्या योगानें राष्ट्राच्या वाढत्या आकांक्षांचें समाधान व्हावयाचें नाहीं. आमच्या तरुण पिढीला पाश्चात्यांच्या वाङ्मयांतील सुंदर कल्पना व मनोहर कविता यांची देखील ओळख झाली पाहिजे असें रवींद्रनाथांचें म्हणणें होतें. शिवाय अंधश्रद्धेनें महात्माजींचा उपदेश तरुण लोक स्वीकारतात हें चांगलें नाहीं.याच्या योगानें एकप्रकारची बौद्धिक गुलामगिरी किंवा गुलामगिरीची मनोवृत्तिच वाढते असाही एक आक्षेप रवींद्रनाथ टागोर यांचा होता.

'शेतकऱ्याला चरखा फिरवावयाला सांगणें म्हणजे त्याला त्याच्या कृषिकर्मापासून परावृत्त करणें आहे. आणि असा उपदेश करणें हें निव्वळ मानसिक दुर्बळतेचें द्योतक आहे. चरख्यावर सगळा भर दिल्यामुळें बहुजनसमाजाचें मन स्वराज्यापासून एक प्रकारें निवृत्त केलें जात आहे. चरख्याच्या आणि स्वराज्याचा यत्किंचितही संबंध नाहीं. To give the charkha the first place in our striving for the country's welfare is only a way to make our insulted intelligence recoil in despairing inaction. मनुष्य चरखा फिरवावयाला लागला म्हणजे तो एक निर्जीव यंत्र होऊन बसतो. चरखा चालविणें ही कांहीं उत्पादन क्रिया नाहीं. जी गोष्ट यंत्रानें साध्य आहे ती करण्यांत तो आपली चैतन्यशक्ती निष्कारण खर्च करतो. आणि अशा रीतीनें स्वतः मृतप्राय गोष्टींत कालापव्यय करतो. सूत काढणारा आपल्या स्वतःपुरता पहात असल्यामुळें तो जगाबद्दल उपेक्षाबुद्धी बाळगतो. त्याचें चित्र आत्मकेंद्रित झाल्यामुळें तो जगाची पर्वा करीत नाहीं व निष्प्राण यंत्राप्रमाणें आपलें काम करीत रहातो. आर्थिकदृष्ट्या चरखा उपयुक्त आहे यांत शंका नाहीं पण चरख्यानें व खादीनें स्वराज्य मिळविण्याची कल्पना हास्यास्पद आहे.'

( मॉडर्न रिव्ह्यू-डिसें. १९२५ )

महात्माजींनीं The Great Sentinel या मथळ्याखालीं एक लेख लिहून टागोर यांच्या वरील आक्षेपांना उत्तर दिलें आहे.

' रवींद्रनाथांनीं एक गोष्ट मान्य केली आहे कीं चरखा हा गरिबांचा प्राण आहे—त्यांचें आशास्थान आहे. ते स्वतः कवि आहेत व आपल्या कल्पनासाम्राज्यांत विहार करीत असतात. तेव्हां त्यांनीं काढलेले उद्गार ' निरंकुशः कवयः ' या कोटींतील आहेत असें निःशंक समजावें. चरखा हा मुख्य धंदा नाहीं, तो जोडधंदा म्हणून करावयाचा आहे ही गोष्ट रवींद्रनाथ विसरले आहेत. कविवर्यांनीं जर दररोज एक अर्धा तास चरखा फिरविला तर त्यांच्या हातून उत्कृष्ट काव्य निर्माण होईल. कारण दरिद्रनारायणाचें स्वरूप त्यांना त्याशिवाय अधिक स्पष्टतेनें दृग्गोचर होणार नाहीं, यांत्रिक शक्तीचा आम्ही उपयोग करीत नाहीं असें नाहीं. पण जें मनुष्याला सहज करतां येईल तें यंत्राकडून कां करवून घ्यावयाचें ? चरखा हें सुद्धां एक प्रकारचें यंत्रच नाहीं काय.? अंधश्रद्धेनें माझ्या उपदेशावर विश्वास ठेवून किंवा सारासारविचार किंवा चिकित्सक बुद्धी यांना सर्वस्वी फांटा देऊन माझ्या उपदेशाप्रमाणें कोणी वागावें असा प्रयत्नच मी केलेला नाहीं. चरख्यावर जर लोकांचा थोडा विश्वास सध्यां बसत असला, तर तो पूर्ण विचारांतींच बसत चालला आहे. टागोर यांना सुंदर काव्यें व ललितवाङ्मय यामध्येंच आयुष्याचें सर्वस्व आहे असें वाटत असेल ! परंतु सध्यां देशाची स्थिति कोणत्या प्रकारची आहे ? परक्या नोकरशाहीशीं आमचें युद्ध चालू आहे. आमच्या घराला आग लागली आहे ! अशा वेळीं सुंदर गीतें व काव्यें गात आणि कर्ण-मधुर तंतुवाद्यें वाजवीत किंवा ऐकत आम्ही बसावयाचें कीं काय ? सध्यां काव्यानंदामध्यें दंग होऊन शेक्सपियरच्या, कालिदासाच्या, किंवा रवींद्र-बाबूंच्या चमत्कृतिजन्य व मनास आल्हाद देणाऱ्या काव्यसुमनांचा मधु-मधुर गंध घेऊन किंवा त्याचा रसास्वाद अनुभवून तृप्त रहाण्याचे हे दिवस नाहींत. हिंदुस्थानला आग लागली आहे. कोट्यावधि लोक गुलाम-गिरीमध्यें खितपत पडले असून अर्धपोटीं राहून मरत आहेत. अशा वेळीं कविवर्यांनीं देखील आपला वीणा किंवा सतार क्षणभर बाजूला

ठेऊन काम करण्यास किंवा चरखा चालविण्यास पुढें यावें! स्वातंत्र्या-प्रीत्यर्थ चाललेलें हें महायुद्ध संपलें आणि देशाला लागलेल्या दारिद्र्याची व उपासमारीची आग शमली म्हणजे मग कविवर्यांना आपलीं सुंदर गाणीं रचण्याला हवा तितका वेळ मिळेल! सध्यां चरख्याचा आवाज हेंच मधुर संगीत कोणत्याही सतारीच्या किंवा सारंगीच्या आवाजापेक्षां आम्हांला जास्त कर्णमधुर वाटलें पाहिजे!"

## टागोरांची मुलाखत

एका अमेरिकन पत्राच्या प्रतिनिधीला मुलाखत देतांना रवींद्रबाबूंनीं पुढील उद्गार काढले:—

"आज हिंदुस्थानांतील असंख्य जनतेवर गांधींची विलक्षण छाप पडली आहे याचें रहस्य हेंच कीं, गांधी यांची चैतन्यशक्ती सुप्तावस्थेंत नसून तिच्यांत प्रेरणेचें सामर्थ्य आहे. दुसऱ्याच्या अंतरंगांतील चैतन्य ती जागृत करते, त्याचप्रमाणें गांधींच्या त्यागवृत्तीमुळें त्यांना विलक्षण तेज प्राप्त झालें आहे. त्यांचा त्याग विशिष्टकाळापुरता अथवा विशिष्ट वस्तूपुरता नसून त्यांची वृत्ति स्थितप्रज्ञाची झाली आहे. पुष्कळ पुढारी लोक अनेक वेळां स्वार्थत्याग करीत असल्याचें आपणास आढळतें; पण त्या त्यागाच्या देखाव्याच्या पोटांत कसली तरी भोगेच्छा लपून बसलेली असते. त्यांचा त्यागही हेतुमूलक असतो. एकादा सराफ कोणाला द्रव्य देत असतां ज्याप्रमाणें त्याचें पुष्कळ व्याज मिळण्याची आशा करीत असतो, त्याप्रमाणें हे पुढारीही आपला त्याग व्याजीं लावीत असतात. गांधींच्या त्यागाचा प्रकार याहून सर्वथा भिन्न आहे. त्यांच्या उदार-चरिताच्या मुळाशीं कोणताही हेतु नाहीं. यामुळें या त्यागी पुढाऱ्यांपैकीं त्यांच्या जोडीला बसविण्याची योग्यता एकाच्याही अंगीं नाहीं. प्रत्यक्ष यज्ञपुरुषाचें दर्शन कोणास करावयाचें असेल, तर त्यानें गांधी यांस भेटावें. यज्ञाला स्वतः मनुष्यरूप घ्यावेसें वाटलें आणि गांधींच्या रूपानें तो अवतरला, असें मला वाटतें.

"त्यांना नांवाची इच्छा नाहीं. सामाजिक परंपरेंत महत्वाचें स्थान त्यांना

नको. पैशाची ते पर्वा करीत नाहींत आणि आपल्या हातीं कांहीं सत्ता असावी अशीही त्यांची इच्छा नाहीं. भारतभूमीचें सिंहासन तुम्ही त्यांना देऊं केलें तर, त्याच्या जडावांतील रत्नें मोकळीं करून आणि तीं विकून टाकून तो सारा पैसा ते गरीब दुबळ्यांना वांटून देतील; धनाढ्य अमेरिकेनें उद्यां आपला सारा पैसा गांधीजीस देऊं केला, तर मानवकुलाच्या उन्नतीसाठीं एकाद्या कारणीं त्यांना तो लावतां न आला तर त्यांतल्या एकाद्या फुटक्या कवडीला देखील ते शिवावयाचे नाहींत.

" आपल्याजवळील कोणती वस्तु लोकांना देतां येण्यासारखी आहे, याचाच विचार त्यांचें चित्त सदोदित करीत असतें. त्याच्या मोबदल्याचा विचार तेथें उपजतच नाहीं. फार काय पण ' उपकार झाले ' एवढे शब्दसुद्धां ऐकण्याची त्यांची इच्छा नाहीं.

" माझें हें लांबलचक वर्णन ऐकून तुम्ही भांबावून जाऊं नका. यांत अवास्तव वर्णनाचें एक अक्षरसुद्धां नाहीं.

गांधी यांची पुरी ओळख मला पटली आहे. आमच्या बोलपूर येथील शाळागृहांत गांधी कांहीं दिवस येऊन राहिले होते, तेव्हां त्यांची अंतर्बाह्य ओळख करून घेण्याची पुरी संधी मला मिळाली होती. गांधी यांचें चित्त अत्यंत निर्भय असल्यामुळें त्यांच्या आत्मयज्ञाला अतुल सामर्थ्य प्राप्त झालें आहे. मोठे चक्रवर्ती सत्ताधीश, प्रचंड तोफा, लखलखीत शस्त्रास्त्रें, महाभयंकर अंधारकोठड्या, तुरुंगांतील नानाविध मनुष्यसंहारक साधनें, अपमान, अथवा शरीरघात यांपैकीं कोणापुढेंही त्यांचा दिव्य जीवात्मा मान वांकविणार नाहीं. फार काय, पण प्रत्यक्ष मृत्यु आपल्या करालरूपानें त्याजसमोर येऊन उभा राहिला, तरी गांधींचें चित्त लवभरही कंपायमान होणार नाहीं. गांधी हा जीवन्मुक्त आत्मा आहे. मला उद्यां कोणी गळफांस लावला तर ' धांवा हो धांवा ' असा टाहो मी फोडीन, पण अशा स्थितींत गांधींच्या मुखावाटें दुःखाचा उच्छ्वासही निघणार नाहीं, अशी माझी खात्री आहे. उलट गळफास लावणाऱ्याकडे पाहून त्यांना खरोखरच हंसू येईल. मरतांनासुद्धां अगदीं हंसतमुखानें ते प्राण सोडतील.

## कवींद्र रवींद्रनाथ टागोर

एकादें मूल जितकें साधें आणि अहेतुक असतें तितकेच गांधी हेही साध्या वृत्तीचे गृहस्थ आहेत. त्याचप्रमाणें त्यांची सत्यनिष्ठाही अद्वितीय आहे. मनुष्यजातीबद्दल त्यांच्या चित्तांत जिवंत प्रेम आहे. इतकेंच नव्हे, तर ते जागृत असून व्यक्तदशेला येण्याकरितां एकसारखें धडपडत असतें. गुहेंत रहाणाऱ्या तत्त्ववेत्त्याप्रमाणें त्यांचें प्रेम गुप्त राहूं इच्छीत नाहीं. मानवजातीचें कल्याण करावें या एकाच इच्छेनें प्रेरित होऊन त्याच खटपटींत सुळीं जाणाऱ्या ख्रिस्ताची वृत्ति गांधी यांच्या ठिकाणीं आहे. गांधी यांची ओळख जों जों अधिक पटत जाते, तों तों त्यांजबद्दलची आपली भक्ति अधिकाधिक वाढत जाते. भविष्यत्काळीं जगाला नवें वळण लावण्याच्या कार्यांत गांधी यांजकडे मोठी महत्त्वाची भूमिका येणार, हें सांगावयास पाहिजे काय ?

"मी स्वतः जगविख्यात असलों तरी महात्मा गांधींची ओळख जगाला मी काय पटविणार ? आणि तें मला साधणार तरी कसें ? या प्रभावान् दिव्य आत्म्यापुढें मी कःपदार्थ आहे आणि खरें पाहतां जो उपजतच मोठा, त्याला दुसऱ्यानें मोठेंपण तरी काय द्यावें ? अशा पुण्यात्म्यांचा मोठेपणा स्वयंभू असतो. त्यांची प्रभा आत्मतेजानेंच सर्वत्र फांकत असते. त्यांचा प्रकाश ग्रहण करण्याइतकी जगाची तयारी झाली म्हणजे ते आपोआपच प्रकट होतात. अशी वेळ आली म्हणजे गांधीही प्रकट होतील. जगालाही शुद्ध प्रेमपूर्ण स्वातंत्र्य आणि सर्वत्र बंधुभाव या वस्तूंची जरूरी आहे, पण त्यांचें ग्रहण करण्याचें सामर्थ्य त्याला आलें म्हणजे गांधींचा संदेश ऐकण्यास तें पात्र होईल, आणि त्याच वेळीं तें गांधीजीस ओळखील.

आमच्या पौर्वात्य संस्कृतीचें अखेरचें ध्येय गांधींच्या रूपानें अवतरलें आहे. मनुष्य हा स्वभावतः शुद्ध चैतन्यरूप आहे. ही पूर्वेनें सांगितलेली खूणगांठ आपल्या प्रत्यक्ष चारित्रानें साऱ्या जगाला गांधी आज पटवित आहेत. मनुष्यप्राण्यांचें हें खरें स्वरूप नीतिमय आणि प्रेममय परिस्थितींतच वाढीस लागतें, हें गांधी आज सिद्ध करून दाख-

वीत आहेत. त्याचप्रमाणें परस्पर द्वेष आणि बंदुकीच्या दारूचा धूर या वस्तूंनीं या स्वरूपाचा नाश होतो, हें आपण पहात आलोंच. उल्हाट-यंत्रांच्या धूम्रमय वातावरणांत मानवी चैतन्य जीव धरूं शकत नाहीं.

हिंदुस्थानाला एका वर्षाच्या अवधींत स्वराज्याची प्राप्ती होईल, असें थोड्याच दिवसांपूर्वी गांधी बोलले होते. या बांधलेल्या मुदतींत हिंदुस्थानाला स्वराज्य कदाचित् मिळणार नाहीं, तथापि या बाबतींत गांधींची आत्मश्रद्धा पक्की आहे, यांत मात्र संदेह नाहीं. आपलें हें साध्य वस्तुसृष्टींत आणण्याकरितां हवे ते हाल ते सोसतील, हवा तेवढा त्याग करतील आणि कोणत्याही दुःखाला भिऊन ते मागें सरणार नाहींत, यांत मात्र संदेह नाहीं.

दाक्षिण आफ्रिकेंत आठ वर्षेंपर्यंत शांततेचें युद्ध करून गांधींनीं अखेरीस यश मिळविलें. **पाशवी शक्तीच्या बळावर कांहीं काळपर्यंत सत्य दडपून टाकतां येईल; पण अखेरीस सत्याचाच जय होणार हें निश्चित आहे.** सध्यांची असहकारितेची चळवळ अत्यंत महत्वाची आहे. कल्पनासृष्टि आणि जडवादाची दंडनीति यांजमध्यें हें युद्ध आहे. शुद्ध जडात्मक दंडनीति आणि कल्पनासृष्टींतील चैतन्यशक्ती यांच्या युद्धांत चैतन्यशक्तीचाच जय अखेरीस होईल, असें मला वाटतें. ही प्रचंड चळवळ गांधीसारख्या योग्य पुरुषाच्या हातीं आहे, हें खरोखर मोठें नशीबच म्हटलें पाहिजे. गांधींच्या सदाचरणामुळें आज सारी भरतभूमी त्यांच्या पायीं लागली आहे. हिंदनौकेचें सुकाणूं गांधींच्या हातीं असेपर्यंत हें जहाज भलत्या मार्गाला लागेल अथवा खडकावर जाईल अशी धास्ती मला वाटत नाहीं. इतकेंच नव्हें, तर अखेरीस आपल्या नेमलेल्या बंदरांत तें सुखरूप पोंचेल याबद्दलही मला शंका वाटत नाहीं." ('पुण्यश्लोक')

## गांधीचा वाढदिवस व टागोरांचें भाषण

महात्मा गांधींच्या ६३ व्या वाढदिवसाचा समारंभ रवींद्रनाथ टागोर यांच्या शांतिनिकेतन संस्थेंत साजरा झाला. त्या प्रसंगीं कवींद्र रवींद्रनाथ

# कवींद्र रवींद्रनाथ टागोर

टागोर यांनीं गांधीजींच्या चरित्रपर मननीय भाषण केलें. त्यांतील मुख्य भागाचा गोषवारा पुढें दिला आहे:—

"आज हिंदुस्थानांत चालू असलेला स्वातंत्र्याचा लढा कसा तरी शेवटास जाईलच. आपण असें धरून चालूं की हिंदुस्थानाला उद्यां स्वातंत्र्यहि मिळेल. तरी देखील आजच्या इतिहासांत विचार करण्याजोगी महत्वाची बाब कोणती असल्यास आजच्या धुळींतूनही वर डोकें काढून जी इतिहासांत टिकाऊ होऊन राहील तीच होय. अशा दृष्टीनें विचार करूं लागलों म्हणजे आज ज्या महात्म्याचा वाढदिवस साजरा करण्यास आपण एकत्र जमलों त्याच्या चरित्रांतील प्रेरकशक्तीची थोरवी आपण ओळखूं शकूं.

ही प्रेरक शक्ति अत्यंत बलवान आहे. या शक्तीनें राष्ट्राच्या हृदयावरील फार दिवसांचें आलस्याचें दडपण झुगारून दिलें आहे. अत्यल्प वर्षांच्या मुदतींत हिंदुस्थानाला खरोखर नवजीवन लाभलें असून अखिल-देशाचा नूर एकदम पालटून गेला आहे. गांधीजी देशाच्या चळवळीचे आखाड्यांत उतरण्यापूर्वी भारतभूमीच्या मुखावर भितीचा काळा बुरखाच जणुं ओढलेला होता. स्वतःविषयींच्या कमीपणाच्या भावनेनें बहुजन समाजाची वृत्ति लुळीपांगळी बनली होती. परकीयांची मर्जी संपादन करण्यासाठीं अर्जविनंत्यांची पायधरणी करण्याच्या आत्मविश्वास-शून्य प्रवृत्तींतून जन्म पावलेली याचक वृत्ति आमच्या हाडीं—मांसीं खिळून बसली होती !

हिंदुस्थानाबाहेरून आलेल्या केवळ उपटसुंभ लोकांचेंच राज्यकारभारांत सर्वस्वीं वजन ! आाणि ज्या भूमीवर अनेक शतकांच्या ऐतिहासिक कालौघांत हिंदी जनतेच्या जीवनाचे व संस्कृतीचे प्रवाह एकजीव होऊन राहिले त्या जीवनाला व संस्कृतीला जणुं चार दिवसांच्या आगंतुकाप्रमाणें कांहींच महत्व नाहीं ! यापेक्षां शोचनीय अशी दुसरी कोणती परिस्थिती असूं शकेल ? सेवा, ज्ञान व प्रेमळ सलोखा, या

साधनांनीं मातृभूमीच्या खऱ्या स्वरूपाची ओळख पटवून घेण्याच्या आपल्या मार्गांत उत्पन्न केल्या गेलेल्या अडथळ्यामुळें आपल्या जन्मभूमींतच खरोखर आपण परदेशीं बनलों आहों ! कारभार चालविणारीं यंत्रें आणि घटनेची व्यवस्थाच राज्यसूत्रधार होऊन बसली; असल्या सत्ताधाऱ्यांच्या हातांतील तलवारी व अस्त्रसंभार यांमुळेंच त्यांना अग्रपूजेचा मान मिळाला आणि आम्ही मात्र कःपदार्थ बनलों. मनाच्या भ्रमिष्ट स्थितींत परवां परवांपर्यंत आपण वरील हीनदीन परिस्थिती मान्य करीत आलों आणि त्यामुळेंच आपण बुद्धीनें क्लीब बनलों आणि अज्ञानांधःकारांत चांचपडत राहिलों ! मधूनमधून लोकमान्य टिळकासारख्या वीर्यशाली विभूतींनीं आमच्या नबळाईच्या काळोखी ढगांवर स्वतःचे जीव धोक्यांत घालून जोराचें प्रहार केले आणि आमच्या ठिकाणीं आत्मविश्वासाची जागृति करणें हेंच आपल्या आयुष्याचें ध्येय ठरविलें. परंतु प्रत्यक्ष कृतीच्या आखाड्यांत चौफेर पराक्रम गाजवून याच आत्मविश्वासाच्या ध्येयाची मात्रा जालीम पद्धतीनें देण्याचा उपक्रम महात्मा गांधींनीं केला. स्वतःच्या अंतःकरणांत हिंदी संस्कृतीशीं तादात्म्य पावून आणि आपल्या तपस्येची अतुलनीय शक्ति बरोबर घेऊनच भारतभूमींत नवजीवन निर्माण करण्यासाठीं महात्मा गांधीं या कर्मभूमीच्या आखाड्यांत उतरले. आपल्या देशांत निर्भय आत्मप्रतीतीच्या मोहिमेला आतांच योग्य रीतीनें तोंड लागलेलें आहे.

परकीय व्यापारी राज्यानें आपला साम्राज्यशाही वळणाचा व्यापार आजपर्यंत आपल्या देशांत चालविला आणि आमच्या भ्याड मनोवृत्तीच्या पायावर आपल्या या व्यापाराची इमारत उभारली. आमच्या नामर्दपणाचा आश्रय मिळाला नसता तर परकीय आरमार व लष्कर यांच्या कारभाराचे इमारतीला आपल्या देशांत पुरेशी जागाच मिळाली नसती. नामर्दाईचें स्वरूपांतील आपल्या पराभवाचें हें मोठेंच वर्म आम्हीं आपल्या हितशत्रूचे हातीं दिलें ! आम्हीं हा जो स्वतःचा आपला आपणच पराभव करून घेतला त्यांतून महात्माजींनीं आपल्याला

मुक्त केलें आहे. शौर्यधैर्याच्या नवजीवनाचे प्रचंड प्रवाह महात्माजींनी देशभर खेळाविले आहेत. आमच्यांतील शौर्यधैर्याच्या जाणिवेचा अभाव हाच राज्यकर्त्यांच्या एका काळच्या कारभाराचा सखोल व मजबूत पाया होता. हा पायाच गांधीजींनी खिळखिळा करून सोडल्यामुळें सत्ताधारी आज आपल्याशीं तडजोडीची भाषा बोलण्यास तयार झाले असून जागतिक समाजांत आमच्या योग्य मानाची मागणी मागण्यास आपण सहज समर्थ झालों आहों.

आज इंग्लंडांत चालू असलेल्या गोलमेजाच्या शाब्दिक लढाईत गांधीजी गुंतले असतील, त्यांनीं खादीचा प्रचार चालविलेला असेल, चालू औषधीशास्त्र आणि भौतिक यंत्रयुग यांवर त्यांचा विश्वास असेल वा नसेल. कांहींहि असलें तरी प्रचलित मतें किंवा कार्यपद्धति यांच्या बंधनांतच या विभूतीचा मोठेपणा गुरफटून राहिलेला आहे असें मानणें उचित नव्हे. ज्या कालाशीं त्या विभूतीचा संबंध आला त्यांत त्या विभूतीचे हातून कांहीं चूकहि घडणें संभवनीय आहे. यांत मतभेद असूं शकतील पण या सर्व वरवरच्या गोष्टी झाल्या. आपल्या चुका गांधीजींनीं कबूल केलेल्या आहेत. बदलणाऱ्या काळाबरोबर त्यांना आपलीं मतेंहि बदलावीं लागलीं आहेत, परंतु सत्याला चिकटून राहावयाची श्रद्धा हाच गांधीजींच्या सर्व चारित्र्याचे इमारतीचा अचल व दुर्दमनीय असा पाया आहे. कर्माच्या चिलखताप्रमाणें ही अजिंक्य श्रद्धाहि महात्माजींच्या जीवात्म्याबरोबरच जन्माला आली आहे. या शक्तीची प्रतीति ही मानवी समाजाच्या इतिहासाचे खजिन्यांतील सदैव टिकणारी अशी ठेवच आहे! क्षणभंगुर गरजांच्या या जगांत अनित्य वस्तूंचा प्रवाह एकसारखा वहातच असतो. परंतु सर्व क्षणभंगुर गरजांच्या धुक्यापलीकडे नजर टाकली असतां आपल्याला दिसणारें जें हें या महात्म्याच्या विभूतिमान् जीवनाचें तेज त्या तेजाचाच गौरव करावयास आपण शिकूं या.

अखिल देशांतील जनतेच्या हृदयांत महात्माजींच्या चारित्र्याचें हें तेज संचरून राहिलें असून आमच्यांतील भ्याड वृत्तीला तें पळवून लावीत आहे. या झगझगति तेजानें दैदिप्यमान् बनलेली साधक गांधीची मूर्तीच

जगाच्या अंतानंतरहि अमरत्वाच्या सिंहासनावर विराजमान होऊन राहणारी आहे. अडचणी किंवा संकटें यांना गांधीजींनी आपल्या मार्गात थारा दिलेला नाहीं. स्वतःच्या क्षणभंगुर चुकांनी ते खुजे बनले नाहींत. वर्तमानकाळाच्या खळबळाटाच्या आंदोलनाचे मध्यभागीं वावरत असूनहि या महात्म्याची मनोवृत्ति त्या खळबळाटाचे वर डोकें काढूं शकते आणि योग्यायोग्य विचारांची व आचारांची निवड करण्याइतका मनाचा समतोलपणा त्या मनोवृत्तींत राहूं शकतो. चारित्र्याची असली प्रबळ शक्ति ज्या विभूतीच्या अंतःकरणांत वास करीत आहे अशा विभूतीला वाढदिवसाचे प्रसंगीं आपण नमन करीत आहों.

मला अखेर इतकेंच सांगावयाचें आहे कीं, बापजाद्यांची नक्कल करीत राहणें हाच कांहीं मनुष्यत्वाचा विशिष्ट गुण नव्हे. जनावरें देखील परंपरागत संवयीच्या जुनाट घरट्यांना चिकटून रहातात. नवचैतन्य निर्माण करण्यांतच मनुष्य युगानुयुगें आपल्या जीवनाचें वैशिष्ट्य व्यक्त करीत आलेला आहे. कालानें जीर्ण झालेल्या कल्पना मनुष्याला आपल्या बंधनांत कधींच जखडूं शकत नाहींत. महात्माजींनीं एका दिशेनें ही जी प्रतिकाराच्या बंडाची भावना जागृत केली तिचा हिंदुस्थानाला अंध बनविणाऱ्या परंपरागत मूर्ख चालीरीतींना नामोहरम करण्याचें कामींहि उपयोग करून घेण्यासाठीं प्रतिकाराच्या प्रवृत्तीची जोपासना सर्व दिशांनीं करून तिला सामर्थ्यवान् बनविणें हेंच आपलें तपस्येचें साधन बनवूं या, आणि याच कामीं प्रयत्नांची शर्थ करूं या. जातिभेद, धार्मिक मतभेद आणि मूर्ख रूढी यांच्या जंजाळांत आपण गिरक्या खात राहूं, तोंपर्यंत आम्हांला स्वतंत्र करण्याचें सामर्थ्य कोणांत आहे! मत-मोजणीच्या शर्तीवर किंवा वेगवेगळ्या वर्गाच्या विशिष्ट हक्कांबाबतच्या आंकडेमय काथ्याकुटीचे जोरावरच पारतंत्र्याच्या खेदजनक चिखलांतून एखादें राष्ट्र मुक्त झाल्याचा दाखला जगाच्या इतिहासांत कधींकाळीं निर्माण होणें शक्य आहे काय? अंतःकलह व बंधनें यांच्या चिरफळ्यांनीं ज्या देशांतील सामाजिक इमारतीचा पाया जागोजाग

पोखरून गेलेला आहे, ज्या देशांतील लोक आपल्या दैनंदिनींतून अगर पंचांगांतून घाणीचे ढीग घेऊन समाजभर वावरत असतात, ज्यांच्या मनोवृत्ति अज्ञानामुळें सद्सद्विवेकशून्य बनून ठराविक जलप्रवाहांत ठराविक 'पवित्र'वेळीं स्नानें केली असतां जन्मोजन्मीं सांठविलेलीं पापें धुवून निघतात असें प्रत्यक्ष व्यवहारांत मानण्यापर्यंत ज्यांची मजल गेली आहे, स्वतःची बुद्धि व शक्ति यांचा उच्छेद करणाऱ्या प्रवृत्तिलाच कधींहि न चुकणारें वेदवाक्य असें नांव देण्यांतच ज्यांना मोठी धन्यता वाटते, असल्या जीर्ण मनोवृत्तीचे लोक अंतःकरणाबाहेरील परकीयांच्या गुलामगिरीचीं बंधनें तडा-तड तोडून टाकण्याचें सामर्थ्य उत्पन्न करणारें आणि कष्टमय तपस्येनें साध्य असें महात्माजींनीं जागृत केलेलें प्रतिकाराचें 'साधन' चालवूं कसें शकणार आणि अंतःकरणाच्या खोल जाणिवेनें तें सदैव कायम टिकवूं तरी कसें शकणार ? मग सर्व शत्रूंच्या हल्ल्यांतून स्वातंत्र्याची जड जबाबदारी चिकाटीच्या शक्तीनें शिरावर वाहण्याचें निष्ठुर कर्तव्य—पालन करण्याची गोष्ट तर यापुढेंच राहिली ! अंतःकरणांतील शत्रूंबरोबर रणसंग्रामांत विजय मिळविणें ही मनुष्यत्वाच्या वीरवृत्तीची अत्युच्च कसोटी आहे हें सत्य ध्यानांत घेणें आवश्यक आहे. बाहेरच्या शत्रूंशीं लढतांना इतक्या उच्च दर्जाच्या शौर्याची गरजच लागत नाहीं. आज ज्यांना आपण वाढ-दिवसानिमित्त नमन करीत आहों तो महात्मा वीरवृत्तीच्या या अत्युच्च दिव्य कसोटींतून विजयी ठरला आहे.वर वर्णन केलेल्या दुर्धर युद्धांत विजय संपादन करण्याचें साधन जर आपण या महात्म्यापासून शिकलों नाहीं तर त्यांचीं आपण गाइलेलीं स्तुति—स्तोत्रें किंवा केलेला उत्सवाचा खटा-टोप फोल ठरणार आहे ! आपल्या 'साधनाला' आतां कोठें प्रारंभ झाला आहे. संकटांच्या कांटाकुस्यांनीं व अडचणींच्या खडकांनीं व्याप-लेला आपला मार्ग यापुढेंच आहे."

---

# प्रकरण अकरावें.

## रवींद्रनाथ टागोर यांचें तत्त्वज्ञान

रवींद्रबाबूंचें काव्यध्येय कोणतें, त्यांच्या आयुष्याचें अंतिम साध्य काय, त्यांचें तत्त्वज्ञान कोणत्या प्रकारचें आहे हे प्रश्न रवींद्रबाबूंचें चरित्र समजून घेण्याच्या दृष्टीनें अत्यंत महत्वाचे आहेत. साध्या गोष्टींना अध्यात्मिक स्वरूप देऊन त्या गोष्टी आकर्षक पद्धतीनें कशा मांडाव्या ही कला रवींद्रबाबूंना उत्तम साधली आहे. कित्येक वेळीं ज्या गोष्टी आपल्याला बिनमहत्त्वाच्या व लक्ष न देण्यालायक वाटतात त्याच गोष्टी त्यांना अर्थपूर्ण व गूढार्थद्योतक भासतात. त्यांच्या जीवनांतील ही महत्वाची कक्षा विसरतां कामा नये.*

१९१३ चें जगप्रसिद्ध नोबेल प्राइझ मिळवून आशियाखंडाचे कविसम्राट या महनीय पदवीनें अलंकृत झालेले व ज्यांचें यशोगान आज सर्वत्र गायिलें जात आहे, अशा राष्ट्रसंजीवक टागोरांचें नांव जरी कवींद्र म्हणून जगद्विख्यात असलें तरी त्यांची इतर वाङ्मयविषयक कामगिरी कमी दर्जाची नाहीं. वाङ्मयविषयक, धार्मिक, तत्त्वज्ञानात्मक, शैक्षणिक, सामाजिक व सांस्कृतिक बाबतींत त्यांनीं जें कार्य केलें त्यावरून त्यांना ' राष्ट्रोद्धारक रवींद्रनाथ टागोर ' म्हणावयास हरकत नाहीं. नवभारताच्या अंगांत उत्पन्न झालेल्या चैतन्याची व तेजस्वितेची ओळख त्यांनीं सबंध जगास करून दिली. रवींद्रबाबू कवि आहेत पण त्यापेक्षां ते ' द्रष्टे ' आहेत असें म्हटलें असतां अधिक योग्य होईल. आपल्या राष्ट्रीयत्वाची कल्पना अधिक व्यापक—विश्वव्यापी व्हावी व ती प्रेम, ऐक्य व सत्य यांवर उभारलेली असावी असें त्यांचें मुख्य तत्त्व आहे.

---

* ' His Spiritual vision and the subtle and attractive garb with which he clothes the commonest of sentiments are the most outstanding features of the poets entire career. '–D. N. Banerjea in ' India's Nation Builders. '

## कवींद्र रवींद्रनाथ टागोर

राष्ट्राचें पुनरुज्जीवन करून सबंध विश्वांत चैतन्याची जागृति करणें हें रवींद्रबाबूंचें जीवितध्येय आहे. आशा, तेज, चैतन्य आणि जागृति या गोष्टी त्यांच्या वाङ्मयांत सर्वत्र दृष्टीस पडतात.

रवींद्रबाबू खरोखर पाहिलें असतां तत्वज्ञानी नाहींत. त्यांचें सर्व कर्तृत्व काव्यलेखनांत खर्च झालेलें आहे. जगाला कांहीं नवीन तत्वज्ञान शिकवावें या हेतूपेक्षां काव्यानंदाचा रसास्वाद घ्यावा हाच त्यांच्या काव्यरचनेचा मुख्य उद्देश असावा असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्यांच्या काव्यांतून आपल्याला त्यांचे तत्वज्ञानविषयक विचार काय आहेत ते समजून घेतां येणें कठीण नाहीं. कित्येकांच्या मतें त्यांची कविता गूढार्थवाद व ब्रम्हज्ञान या विषयांनींच भरलेली असून तिच्यांत रसिकहृदयाकर्षता व लालित्य नाहीं. रवींद्रांच्या इतर पुस्तकांवरून त्यांचें जें तत्वज्ञान आपणांस प्रतीत होतें त्यावरून त्यांचें काव्यविषयक तत्वज्ञान निराळें असेल असें वाटत नाही. आणि खरोखर पाहिलें असतां तें निराळेंही नाहीं. काव्य आणि तत्त्वज्ञान यांचेसंबंधीं रवींद्रबाबूंचे विचार काय आहेत ते आपण प्रथम पाहूं.

" We ( poets ) set men free from their desires " स्वातंत्र्याचा मार्ग दाखविणें हें कलेचें ध्येय आहे. आपल्या दररोजच्या जीवनाच्या पलीकडच्या जगांत आपल्याला विहार करविण्यास लावण्याचें कार्य कला करीत असतें. आत्मविस्मृति हें कलेचें अंतर्रहस्य असल्यामुळें आपला रोजचा व्यवहार कलेच्या संगतीत आपण विसरतों आणि कलेशीं तादात्म्य पावतों.

कवि जर तत्त्वज्ञानी नसेल तर तो कवि ह्या संज्ञेला पात्र सुद्धां होणार नाहीं. जगाला कांहीं तरी नवीन संदेश कथन करणें, जगाला नवी दृष्टी देणें, निदान नवीन दिशा दाखविणें हें कवीचें कार्य आहे. तत्वज्ञही हेंच करीत असतो. खोल बुद्धीनें व सारासार दृष्टीनें विचार करून जगापुढें कांहींतरी नवे विचार मांडणें हें तत्त्वज्ञाचें उद्दिष्ट असतें. खरा तत्त्वज्ञानी आहे तो कवि असणारच, आणि खरा कवि आहे तो तत्त्वज्ञानी असा-

वयाचाच असा सिद्धांत आहे. या तत्त्वाप्रमाणें रवींद्रबाबू हे खरे तत्त्वज्ञ कवि आहेत. त्यांच्या आकाशसंचारी स्वैर काव्यशक्तीबरोबर त्यांचें स्थायी स्वरूपाचें नवचैतन्योत्पादक तत्त्वज्ञान जन्मास आलेलें आहे. रवींद्रनाथांच्या काव्यशक्तीनें भारतवर्षाला किंबहुना जगाला जितकी मोहिनी घातली आहे तितकी त्यांच्या जीवितविषयक तत्त्वज्ञानानें घातलेली नाहीं ही गोष्ट ध्यानांत ठेवणें जरूर आहे. त्यांचें तत्त्वज्ञान अध्यात्मिक स्वरूपाचें व जागतिक ऐक्याला अनुलक्षून असल्यामुळें त्याकडे ' वसुधैवकुटुंबकं ' वृत्तीच्या लोकांचें लक्ष वेधण्याचें कारण नाहीं. जगाला नवीन संदेश त्यांनीं काय दिला या प्रश्नाचेंही तात्काळ उत्तर देतां येणार नाहीं. त्यांचें तत्त्वज्ञान म्हणजे भारतीय पूर्वसूरींच्या विशिष्ट अध्यात्मिक तत्त्वज्ञानाची व्यवस्थित मांडणी यापलीकडे नाहीं. त्यांचा स्वतःचा असा विशिष्ट पंथ नाहीं. तथापि आध्यात्मिक धार्मिकता हा त्यांच्या तत्त्वज्ञानाचा विशेष म्हणून सांगतां येईल. त्यांच्या तत्त्वज्ञानाबद्दल त्यांचे एक सहृदय टीकाकार रामानंद चतर्जी यांनीं काढलेले उद्गार अत्यंत मार्मिक व यथार्थ आहेत. रामानंद बाबू म्हणतातः—

" In philosophy, he is not a system-builder. He is of the line of our ancient religio-philosophical teachers whose religion and philosophy are fused components of one whole. "

दीनजनांविषयींच्या अनुकंपेनें त्यांचें हृदय भरून गेलेलें आहे. आपल्याच देशांतल्या दीन व आपद्ग्रस्त लोकांबद्दल कळवळा बाळगावयाचा आणि जगांतील इतर आपद्ग्रस्तलोकांबद्दल उपेक्षाबुद्धी दाखवावयाची अशी त्यांची संकुचित व पक्षपाती बुद्धी नाहीं. आर्त लोकांकडून जिकडून हांक येईल तिकडे त्यांचे डोळे वळावयाचें हें अगदीं सिद्ध होऊन राहिलें आहे.

" This is my prayer to thee, my Lord,–
Give me the strength never to disown the poor
Or bend my knees before insolent might."

त्यांचें राष्ट्रीयत्वाचें तत्त्वज्ञान आकुंचित, जातिविशिष्ट, पंथविषयक किंवा अराष्ट्रीयत्वाचें दर्शक नाहीं. हिंदुस्थानच्या अर्वाचीन स्थितीमध्यें जीं वैगुण्यें व जो कमीपणा दृष्टीस पडतो त्याची त्यांना जाणीव आहे. आपल्या देशांतील सद्गुणविशेषांचा सबंध जगांत डांगोरा पिटविण्यांत आणि दुसऱ्यांचे दोष चव्हाट्यावर मांडण्यांत त्यांना भूषण वाटत नाहीं.

स्वामी दयानंद सरस्वतींनीं वेदांचा अभ्यास करा अशी घोषणा केली, परंतु टागोर प्राचीन संस्कृतीकडे जा असें सांगत नाहींत. जगाच्या प्रगतीबरोबर तुम्हीही आपली प्रगति करून घ्या, मागें राहूं नका असा रविबाबूंचा संदेश आहे. दोघांच्या संदेशांत जरी भिन्नता दृष्टीस पडत असली तरी दोघेही प्रगमनशील वृत्तीचे आहेत.

कवींद्र रवींद्रनाथ टागोर यांचें तत्त्वज्ञान Æsthetic Spritualism ( सौंदर्यसमीक्षक अध्यात्मवाद ) या दोन शब्दांत सांगतां येईल. टागोरांचा हा अध्यात्मवाद सामान्य जनतेच्या आटो-क्यांत येण्यासारखा व सर्वसाधारणबुद्धीच्या लोकांना आकलन होण्यासारखा आहे. ज्यांचा बुद्धिवादावर दृढ विश्वास आहे किंवा जे बुद्धिवादावर ( rationalism ) वर आपल्या आयुष्याची उभारणी करतात त्यांना हा टागोरांचा सौंदर्यदृष्टीचा आध्यात्मिक धर्म पसंत पडेल यांत शंका नाहीं. धर्म म्हटला म्हणजे तो त्यागावर, सौंदर्यनाशावर व वैराग्यावर उभारलेला असावयाचा अशी सामान्य जनतेची विचारसरणी असल्यामुळें रविबाबूंचा धर्म सुशिक्षित व बुद्धिप्रामाण्यवादी यांना पटल्यास नवल नाहीं. बुद्धिप्रामाण्यवाद्यांना धर्म व अध्यात्म यांविषयीं विचार करावयास लावणें हें रविबाबूंचें एक कार्य आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. त्यांनीं उपदेशिलेला अध्यात्मवाद सामान्य जन-तेनें आपलीं ऐहिक कर्तव्यें पूर्णपणें बजावीत असतांनाच आचरावयाचा आहे. आपलें जीवन संपूर्ण व सर्वसौख्यसंपन्न असावें अशी त्यांची शिकवण आहे. त्यांच्या शिकवणुकींत त्यागाचे, वैराग्याचे, संन्यासाचे धडे नाहींत. आपलें जीवन अध्यात्माकडे कसें वळवितां येईल तें जीवनांतील एका विशिष्ट

वागणुकीवरून आपल्या ध्यानांत येईल. आपल्या मनांत जी भावना, जो विचार, जी कल्पना आली त्यावरून सुद्धां आपल्या अंतःकरणांत अध्यात्माचा प्रकाश पडणें शक्य आहे. मात्र ती भावना आपल्या हृदयाला हलवून सोडणारी असली पाहिजे, तो विचार आपलें प्रभुत्व गाजविणारा असला पाहिजे व ती कल्पना आपल्या कल्पनाशक्तीचा अपूर्व विलास अशी असली पाहिजे. तरच त्यायोगें आपण कांहींतरी नवीन पहावयाला लायक होऊं. धर्म ही इंद्रियातीत व असामान्य गोष्ट आहे, असें रविबाबूंना वाटत नाहीं. ह्या जगांत राहून, ह्या जीविताचा उपभोग घेऊनच मनुष्याची दृष्टि इंद्रियातीत गोष्टीकडे वळूं लागते व तो अध्यात्माकडे आकर्षिला जातो. विषम गोष्टींचें परस्पराकर्षण या नियमान्वयें हा प्रकार घडणें अशक्य नाहीं. वैष्णवांचें धार्मिक जीवन भक्तिपूर्ण असतें तर टागोरपंथीयांचें सौंदर्यपूर्ण असतें. टागोरांच्या अध्यात्माला सौंदर्यदृष्टीचा भक्तिमार्ग असें म्हणण्यास हरकत नाहीं.

टागोरांच्या परमेश्वरस्वरूपाबद्दल प्रो. राधाकृष्णन् यांनीं काढलेले उद्गार पहाण्यासारखे आहेत. ते म्हणतातः—

"Rabindrnath's God is a person and not the impersonal Absolute of the Vedanta...He gives us a human God, dismisses with contempt the concept of world-illusion, praises action overmuch and promises fulness of life to the religious soul."

परमेश्वर सर्वशक्तिमान, अतिमानुष आणि अनाद्यनंत आहे, हें जरी खरें असलें ती तो आपल्यासारखाच एक मनुष्य आहे. परमेश्वराविषयींच्या अंधुक कल्पना त्याचें सत्यस्वरूप समजून देण्याच्या आड येतात. 'सर्वव्यापी स भगवान् तस्मात्सर्वगतः शिवः' अशी उपनिषदाची शिकवण आहे. 'सत्यं शिवं सुंदरं' हें ईश्वराचें स्वरूप टागोरांना मान्य आहे. ईश्वर ही कृपावंतांची कृपा, दयावंतांची दया व मानवी जीवनाचें सर्वस्व आहे. परमेश्वर हा 'अनंत कल्याणगुणनिधि' आहे.

## कवींद्र रवींद्रनाथ टागोर

Cultivate the spirit of invincible optimism; believe in life; live worthy of life " हा त्यांचा हिंदी राष्ट्राला संदेश आहे.

मानवी जीवनाविषयीं उद्दाम आशावाद व धार्मिक गूढार्थवाद ह्या दोन गोष्टींनीं हिंदी जनतेंत त्यांना विशिष्ट स्थान मिळालें आहे.

## नवभारतनिर्माते–रवींद्रनाथ टागोर

प्रत्येक मनुष्य हा आपापल्या परीनें राष्ट्रोत्कर्षाला व राष्ट्रनिर्मितीला कळत-नकळत, प्रत्यक्ष–अप्रत्यक्ष, हातभार लावीत असतो, असें एका समाज-शास्त्रवेत्याचें मत आहे. राष्ट्रनिर्मितीची कल्पना ही सामुदायिक आहे. व्यक्तिसमुच्चयावर तिची उभारणी आहे. तेव्हां साकल्येंकरून व्यक्तिसमूहाचा परिणाम राष्ट्रोत्कर्षांत परिणत होऊं लागेल तर राष्ट्रनिर्मिती दूर नाहीं. महनीय कर्तृत्वशक्तीनें अलंकृत असलेल्या ज्या व्यक्ति राष्ट्रासाठीं आपलें आयुष्य वेंचतात त्या व्यक्ति कोणत्याही राष्ट्रास भूषणभूतच होत यांत शंका नाहीं. चारित्र्य, कर्तृत्व आणि राष्ट्राभिमान या गुणत्रयीवर राष्ट्रनिर्मिती अवलंबून असते. थोर लोकांच्या व पुरुषश्रेष्ठांच्या कार्यशक्तीमुळेंच खरें राष्ट्र निर्माण होत असतें. थोर लोकांचें जीवन सर्वसामान्य जनतेप्रमाणें कायम ठशाचें रुळलेल्या चाकोरींतून जाण्याचें नसतें. बहुजनसमाजाच्या पाठीमागून ' अंधेन नीयमाना यथान्धाः ' अशा आंधळ्यांच्या माळेप्रमाणें डोळे झांकून जाणें हें त्यांचें ध्येय नसतें. आहारनिद्राहि जीवितक्रमांत आनंद मानून त्यांतच परमसौख्य सांठविलें आहे असें त्यांस कदापिही वाटत नाहीं. मनुष्याचें शाश्वत कल्याण कशांत आहे तें सांगतांना ' साधनें'त रविबाबू म्हणतातः—

" Man's abiding happiness is not in getting anything but in giving himself up to what is greatr than himself, to ideas which are larger than his individual life, the idea of his country, of humanity, of God. "

ह्या शाश्वत कल्याणाच्या पाठीमागें लागून तत्प्रीत्यर्थ आपलें सर्वस्व वेंचणें हेंच आपलें जीवितकार्य आहे असें थोर लोक समजतात.

सबंध मानवजातीचा उद्धार करण्याचें कार्य हातीं घेणें हें महत्कार्य महत्वाचें तर खरेंच, पण आपलें राष्ट्र आणि आपला देश याचा सर्वांगीण विकास करून अखिल विश्वाच्या उत्कर्षाशीं तो एकरूप होऊन जाईल यासाठीं प्रयत्नांची शिकस्त करणें हें अधिक महत्वाचें कार्य आहे यांत शंका नाहीं. मानवता ही गुलाबाच्या फुलाप्रमाणें असून निरनिराळीं राष्ट्रें हीं त्या फुलाच्या पाकळ्या होत. परस्पर प्रेम, सौहार्द आणि सहकार्य याशिवाय त्या फुलाला सुवास येणार नाहीं. नवभारताची निर्मिती कशी करावयाची यासंबंधीं रवींद्रबाबूंनीं पुष्कळ ठिकाणीं मार्मिक विवेचन केलें आहे. नुसतें विवेचनच न करतां त्यांनीं त्या दृष्टीनें सक्रिय प्रयत्नही चालविले आहेत. ते प्रयत्न फलद्रूप झाल्यामुळें त्यांना Maker of New India असें यथार्थतेनें म्हणतां येतें.

/स्वाभिमान–संरक्षण हें राष्ट्रीयत्वाचें पहिलें तत्व आहे. हिंदी संस्कृतीचा अभिमान बाळगून इतर राष्ट्रांच्या श्रेष्ठ संस्कृती आत्मसात करणें राष्ट्रीयत्वाच्या दृष्टीनें हानिकारक नाहीं. उलट उपकारकच आहे. अखिल मानवजातीच्या हिताच्या ज्या गोष्टी असतील त्या कोणीं कोणापासून उचलाव्या, त्यांत मुळींच कमीपणा नाहीं. जग जर आपणां-पुढें एकसारखें चाललें आहे तर आपणांला मागें राहून कसें चालेल? जगाच्या प्रगतीबरोबर आपलीही प्रगति व सुधारणा झाली पाहिजे. हा यथार्थाभिमान खऱ्या राष्ट्रीयत्वाचा द्योतक आहे. आधिभौतिक शास्त्रें, व्यापार वगैरे बाबतींत जरी पाश्चात्यांपासून हिंदुस्थानानें धडे घेतले पाहिजेत तरी त्या गोष्टी उचलतांना हिंदी राष्ट्राच्या संस्कृतीला व स्वभावधर्माला साजतील अशाच रीतीनें त्या आत्मसात केल्या पाहिजेत. हिंदी विचार-सरणीवर पाश्चात्य विचारसरणीचा वरचष्मा असतां कामा नये. हिंदीचें हिंदित्व कायम राखलें पाहिजे, हिंदी राष्ट्रानें वरचढ राष्ट्रांच्या संस्कृतीची व सुधारणांची उसनवारी करावी पण स्वतःचें स्वत्व व व्यक्तित्व गमा-वतां कामा नये. हिंदुस्थानाची अध्यात्मिक संस्कृती प्राचीन व श्रेष्ठ असेल पण म्हणून हिंदुस्थानाला सुधारलेल्या राष्ट्रांकडून कांहीं उसनवारी करा-

वयाची जरूरी नाहीं असें सिद्ध होत नाहीं. जपाननें आपलें स्वत्व राखूनच श्रेष्ठ दर्जा संपादन केला आहे; अशी रविबाबूंची विचारसरणी आहे.

## कविवर्य रवींद्रनाथ

रवींद्रनाथ टागोर जगाला महशूर झाले ते केवळ उत्कृष्ट कवि या नात्यानेंच झाले. त्यांच्याजवळ काव्यगुणापेक्षां इतर गुण प्रकर्षानें असतील पण उत्कटत्वानें नसल्यामुळें ते कविवर्य म्हणूनच प्रसिद्धी पावले. अद्वितीय प्रतिभाशाली, व उत्कट ध्येयवादी अशा 'काव्यसृष्टीच्या परमेश्वरांत' त्यांची गणना करावी लागेल. सजीवसृष्टींतून चराचर सृष्टींत विहार करतां करतां ते विश्वाशीं तन्मय होऊन जातात. त्यांची काव्यसृष्टी मानवी जीवनाशीं संगत असली तरी ती कल्पनेच्या वातावरणांत जेव्हां ती उंच-उंच भराऱ्या मारूं लागते तेव्हां त्यांची कविता स्वर्गीय आहे असें वाटूं लागतें.

रवींद्रांच्या कवितेंत 'आत्मसमर्पणाची' वृत्ति विशेष उत्कटतेनें आढळून येतें. कवीचें जीवितकार्य आणि जीवितध्येय आहे काय याची त्यांना पूर्ण जाणीव असल्यामुळें त्यांनीं आपली काव्यरचना त्या पद्धतीनें केली. त्यांच्या काव्यांतील मुख्य गोष्ट 'गूढगूंजन ( Mysticism ) ही आहे. त्यांच्या सबंध काव्यावर इतकें गूढावरण पडलें आहे कीं, त्यांतून सहजासहजीं अर्थ निघणें सुलभ होत नाहीं, त्यांच्या काव्यगुणांत हा गूढगूंजनाचा गुणविशेष अग्रस्थानीं बसेल. त्यांच्या काव्यासंबंधीं एका टीकाकारानें काढलेले उद्गार त्यांचें यथार्थ वर्णन करणारे असल्यामुळें येथें देत आहे.:—

" Nowhere else in modern poetry do we hear his wonderful combination of simplicity and profundity, of spontaneity and unerring art, of national distinctiveness and universal attractiveness. He is as much a poet of the people as he is a poet of God. He is as much a poet of nature as he is a poet of the

supernatural. He is a personification of lyric rapture and Spiritual bliss. His style is full of subtlety of rhythm, of untranslatable delicacies of colour, of metrical invention.—" ( K. S. Rama swamy Sastri–' Rabindranath Tagore: Poet, Patriot, & Philosopher.' )

## रवींद्रनाथांची वाङ्मयसृष्टी

वाङ्मयविस्ताराच्या दृष्टीनें हिंदुस्थानच्या आधुनिक साहित्यसेवकांत रवींद्रनाथ टागोर सर्वांत उच्च स्थान अलंकृत करतील यांत तिळमात्र शंका नाहीं. त्यांचा अफाट ग्रंथसंभार व विपुल काव्यविस्तार पाहिला म्हणजे मन आश्चर्यभरित होतें व त्यांच्या काव्यशक्तीची बहुप्रसवता व त्यांचें शीघ्रनिर्माणसामर्थ्य पाहिलें म्हणजे मन अगदीं स्तिमित होऊन जातें. हिंदुस्थानच्या कोणत्याही भाषेंत एका ग्रंथकारानें निर्माण केलेलें इतकें वाङ्मय नसेल ! रवींद्रबाबूंनीं बंगाली भाषेंत जीं पुस्तकें लिहिलीं आहेत त्यांची संख्या सुमारें १३० भरेल. हा आंकडा पाहून कोणाचीही छाती दडपल्याखेरीज रहाणार नाहीं. बंगाली पुस्तकांचीं भाषांतरें व स्वतंत्र पुस्तकें मिळून त्यांनीं इंग्रजी भाषेंत सुमारें ४५ पुस्तकें लिहिलीं आहेत. त्यांनीं निरनिराळ्या मासिकांतून निरनिराळ्या प्रसंगीं लिहिलेले शेंकडोंशे लेख आहेत ते निराळेच ! त्यांची अद्याप मोजदादही झालेली नाहीं ! शेक्सपिअर, मिल्टन, डांटे, गटे, वेल्स, शॉ, एडगर वॅलेस इत्यादि ग्रंथकर्त्यांची ग्रंथसंख्या रवींद्रबाबूंच्या ग्रंथसंख्येपेक्षां मुळींच जास्त भरणार नाहीं. वॅलेससारखा कादंबरीकार शीघ्रलेखनाच्या बाबतींत रवींद्रबाबूंना मागें ही टाकील. पण एकंदरीनें रवींद्रनाथांचा वाङ्मयसागर अफाट आहे ही गोष्ट कोणालाही नाकबूल करतां येणार नाहीं.

जास्त लिहिणाराचें लिहिणें कधींच मार्मिक असूं शकत नाहीं. विस्तारानें लिहिणारा लेखक विचारप्रदर्शनापेक्षां नुसत्या शब्दांशीं व भाषेशीं कसरत करीत असतो व त्यांतच आपली प्रौढी मारीत असतो.

एकच कविता लिहावी आणि अजरामर व्हावें असें म्हटलें म्हणजे पुष्कळ कविता लिहून अजरामर होऊं नये असें होत नाहीं. बहुप्रसवता हें जसें विचारदारिद्र्याचें लक्षण आहे तसें तें विचारबाहुल्याचें ही लक्षण आहे हें विसरतां कामा नये. रवींद्रनाथांची कविता सुमारें एक लाख भरेल. पण त्यांत उत्कृष्ट कविता किती आहे याचा विचार केला तर तिचें प्रमाण एकंदर काव्यसंग्रहाशीं हास्यास्पद ठरण्याइतकें असेल हें कांहीं सांगावयास पाहिजे असें नाहीं. मिल्टनचें समग्र काव्य अठरा हजार ओळींपेक्षांही कमीच भरेल. पण मिल्टनशीं रवींद्रनाथांची तुलना केली तर ? वर्डस्वर्थशीं तुलना केली तर ? ब्राउनिंग किंवा टेनिसनशीं केली तर ? आपल्याला काय आढळून येईल ? एक लाख कविता लिहिणारा श्रेष्ठ कीं पांच हजार कविता लिहिणारा श्रेष्ठ ?

रस्किनविषयीं एका टीकाकारानें जें म्हटलें आहे, तें रवींद्रनाथांनाही कांहीं फरकारानें लागूं पडते. तो टीकाकार म्हणतोः—

"The author of more than eighty distinct works upon so miscellaneous a field, of masses of poetry, lectures, letters as well as substantial treatises, was of necessity rather a stimulus than an authority—an influence rather than a master. As one of his foreign readers has said-his readers are charmed, inspired, more than convinced."

त्यांचें इतकें विविध व विपुल वाङ्मय वाचकाला आनंद देईल, क्षण-भर मोहितही करील पण त्याच्या प्रज्ञाशक्तीचें समाधान करूं शकणार नाहीं. जागृति व प्रोत्साहन या कामीं तें उपयुक्त व मार्गदर्शकही ठरेल पण त्यांत सर्वोत्कृष्टता व परिपूर्णता आढळणार नाहीं.

भरमसाट लिहिणाराचें लिखाण जसें शाश्वत स्वरूपाचें नसतें तसें तें सर्वराष्ट्रीय स्वरूपाचें ही नसतें. त्यांत प्रांतिकतेचा आकुंचितपणा असतो. तें त्यानें जर जागतिक अभिरुचीशीं जुळणारें वाङ्मय लिहावयाला घेतलें

तरच कांहींतरी अधिक काळ टिकूं शकेल, एरव्हीं नाहीं. एका पाठोपाठ एकेक ग्रंथ प्रसिद्ध करणाऱ्या लेखकाच्या वाङ्मयांत विचार व कल्पना यांची पुनरुक्ति आढळल्याखेरीज रहात नाहीं. प्रत्येक वेळीं कोठून आणि कसें नाविन्य उत्पन्न करतां येणार ? शिवाय त्यांत दरवेळी तितकी स्फूर्तिदायकता ही कशी आणतां येणार ?

रवींद्रनाथांचा विशाल वाङ्मयसागर वर प्रतिपादन केलेल्या विविधगुणदोषांनीं युक्त आहे. त्यांच्या काव्यांत प्रथमदर्शनींच आढळून येणारा व डोळ्यांत भरणारा दोष म्हणजे त्यांच्या कवितेचा एकसारखेपणा ( monotony ). रचनेंत वैचित्र्य व विविधता नसल्यामुळें वाचकाला त्याच त्याच पद्धतीचा कंटाळा येतो आणि एकसारखावटपणामुळें आवडही उत्पन्न होते. त्यांच्या ग्रंथनिर्मितीचा प्रवाह एकसारखा अखंडित चालू आहे. त्यांत मुळींच थोडासुद्धां खंड पडलेला नाहीं. त्यामुळें नवीन गोष्टींचे मनन करण्यास किंवा नवीन गोष्टीचा अनुभव मिळविण्यास त्यांच्या प्रतिभेला वेळच सांपडलेला नाहीं. मिल्टनच्या काव्यांत दरवेळीं नवीन तेज, नवीन शक्ति आविर्भूत झालेली आपल्या प्रत्ययास येते. पण रवींद्रबाबूंच्या वाङ्मयसृष्टींत प्रगति किंवा नवोन्मेष दृष्टीस पडत नाहीं. त्यांची विचारपद्धती व रचनापद्धती एक ठराविक साच्याची झाली असल्यामुळे आपण कांहीं नवीन वाचीत आहों असें वाचकाच्या मुळीं अनुभवासच येत नाहीं. त्यांचा एक ग्रंथ दुसऱ्या ग्रंथाचीच निराळी आवृत्ति आहे कीं काय असें वाटूं लागतें.डाकघर आणि चित्रांगदा ह्या नाटिका घेतल्या तर त्यात विविधता दृष्टीस पडते, पण डाकघर, वसंतोत्सव व फाल्गुनी हीं एकत्र घेतलीं तर तीं तिन्हीं एकच आहेत असें वाटल्याखेरीज रहात नाहीं. त्यांत वैचित्र्य नाहीं, नाविन्य नाहीं, वैविध्य नाहीं.

रवींद्रबाबूंच्या वाङ्मयांत monotony हा सर्वांत मोठा दोष असल्यामुळें त्यांच्या वाङ्मयाला विशालत्व आलें आहे आणि त्यामुळेंच त्यांच्या ग्रंथविस्ताराचें कौतुक वाटत नाहीं. रवींद्रनाथांना एकच गोष्ट निरानिराळ्या तऱ्हेनें सांगावयाची विलक्षण हौस आहे. त्यामुळें त्याच त्याच गोष्टींची

पुनरावृत्ति मनाला वीट आणते. रवींद्रबाबूंनीं निर्माण केलेले नवीन कविसंकेत जुन्या पूर्वसूरींच्या ठराविक कविसंकेताप्रमाणें एकाच मुशींत ओतले गेले आहेत. त्यामुळें रवींद्रनाथांच्या सर्वच कवितेंत चैतन्य, आल्हाद व तेजस्विता आढळत नाहीं.

रवींद्रनाथांच्या वाङ्मयविस्ताराबद्दल त्यांचे एक टीकाकार व चरित्रलेखक ई. जे. थॉम्सन लिहितात.

" From Rabindranath's abundance it follows almost necessarily that he is a very unequal poet. His inequality is in his thought and matter...His poems rarely fail in beauty of style; but they often fail in grip. Many of his poems trail, spreading the conceptiom loosely. He often does not keep control of his mental processes, but lets the thought slide whither it will, prolixly. He plays too much with externals, with ornamentation. The worst flaw of his later work is his lack of serious intellectual effort. "

रवींद्रबाबूंच्या कवितेंत सौंदर्य व मोहकता कधींच कमी असत नाहीं, पण तिचा परिणाम कायमचा टिकत नाहीं. तिच्यांत वेधकता कमी नसली तरी विद्ध करण्याचें सामर्थ्य नाहीं. एकाच तत्त्वविचाराच्या बिंदूवर आपली दृष्टी स्थिर करून काव्य लिहिण्याची रविबाबूंची पद्धत नसल्यामुळें त्यांच्या काव्यांत पुष्कळदां विस्कळितपणा भासतो. विचारांना वाटेल तसे फाटे फुटतात आणि ते स्वैरपणें इतस्ततः वाहवत जातात. बाह्य सजावट, अलंकार व ठाकठिकीची रचना यांकडे रवींद्रबाबूंचें प्रामुख्यानें लक्ष असतें. जितके म्हणून उत्कट व बुद्धिपुरस्पर परिश्रम करावयास पाहिजेत तितके न केल्यामुळें वाङ्मय कमीदर्जाचें झालें आहे. रवींद्रबाबूंच्या श्रेष्ठ दर्जाच्या व उज्ज्वल काव्यशक्तीला हे दोष कलंकभूत होत, यांत मात्र शंका नाहीं.

## उपसंहार

ह्या अवाढव्य विश्वसृष्टीशीं समरस होऊन पुनः ह्या विश्वापासून वियुक्त होणें हें त्यांच्या कलाकृतीचें ध्येय होतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्यांच्या कवितेंत ' आत्म्याच्या सदाचाराचें, साकांक्षतेचें, व सरलतेचें जणूं प्रतिबिंबच पडलें आहे. ' ज्यावेळीं त्यांचें चित्त स्थिर नसेल, त्यांच्या चित्तावर अस्वस्थतेचीं वादळें उठत असतील त्यावेळी त्यांची काव्यदेवता ही विशुद्ध व निर्मल स्वरूपांत दिसत नाहीं. त्यांचें मन ज्यावेळीं अनंताशीं तादात्म्य पावतें, तें जेव्हां निर्मल, अचल, प्रशांत व अंतर्मुख असतें त्यावेळीं त्यांच्याहातून जी काव्यरचना होते ती विश्ववंद्य होण्यासारखी असते.

**रवींद्रनाथ टागोर** यांना बंगाली वाङ्मय आणि बंगाली संस्कृती यांचे प्रतिनिधी म्हणतां येईल. त्यांच्या जन्मापूर्वींचे बंगाली वाङ्मय, ब्राह्म-समाज, पाश्चिमात्यांशीं संघटन इत्यादि गोष्टींचा परिणाम त्यांच्या आयु-ष्यावर व त्यांच्या कर्तृत्वावर झाल्याखेरीज राहिला नाहीं. जुनें जानपद व अभियुक्त वाङ्मय त्यांनीं आत्मसात् करून घेतलें आहे. त्यांच्या अध्या-त्मिक काव्यानें जरी जगाला वेड लाविलें असलें आणि त्यांना जगप्रसिद्ध केलें असलें तरी ते खरे अध्यात्मिक कवि नाहींत. निसर्ग आणि प्रेम हे त्यांचे आणि त्यांच्या कवितांचे आवडते विषय आहेत. निसर्गाशीं तन्मयता पावून प्रेमानंदांत त्यांची कविता नाचूं लागली म्हणजे त्यांच्या कवितेचें स्वाभाविक स्वरूप वाचकांच्या दृष्टीस पडतें. पूर्वसूरींच्या काव्याची छाया त्यांच्या काव्यावर उमटल्यावांचून राहिली नाहीं. भाषेच्या बाबतींत रवींद्रनाथांनीं बरीच क्रांति केली आहे. त्यांची भाषा जशी साधी तशी काव्यगर्भ असल्यामुळें जशी ती सुबोध तशी ती गूढाशयपूर्ण झाली आहे. सामान्य जनतेची भाषा आणि भाषासरणी यांचा काव्यांत उपयोग करण्यांत रवींद्रनाथांनीं अद्वितीयत्व मिळविलें आहे. संस्कृत भाषापद्धतीशीं समन्वय केल्यामुळें त्यांच्या भाषेला भारदस्तपणा व उठाव-दारपणा आला आहे.

## कवींद्र रवींद्रनाथ टागोर

रवींद्रनाथ हे पहिल्यापासून धर्मप्रवण वृत्तीचे असल्यामुळें त्यांचें वाङ्मय धार्मिक अध्यात्माच्या तुषारबिंदूंनीं सिंचित झालें आहे. रवींद्र-बाबू काव्यधर्माशिवाय कोणताही धर्म मानीत नाहींत. कविधर्म ( Poet's religian ) हाच माझा खरा धर्म आहे असें ते म्हणतात. मनुष्य धर्मनिष्ठ असल्याशिवाय त्याच्या हातून कोणतीही कामगिरी होत नाहीं, अशी त्यांची विचारसरणी आहे. कर्तृत्ववान रवींद्रनाथ धर्मनिष्ठ नाहींत असें कोण म्हणणार आहे ?

सामान्य जनतेच्या दररोजच्या व्यवहारांत साधारणपणें कलेला स्थान नाहीं. व्यवहारिक गोष्टींचा श्रेष्ठकनिष्ठपणा त्यांच्या उपयुक्तेच्या कमी-अधिकपणावर आवलंबून असतो. कलादृष्टी म्हणजे उपयुक्ततेचा अभाव अशी सामान्य लोकांची समजूत असते. ही समजूत नाहींशी करून आपलें जीवन कसें कलामुक्त, सौंदर्यपूर्ण आणि त्याचबरोबर सुखी करतां येईल हें रवींद्रनाथांनीं आपल्या उदाहरणानें जगास दाखविलें आहे. व्यावहारिक जीवनाशीं काव्य विसंगत नाहीं उलट काव्याच्या सहवासानें आपलें जीवित अधिक उच्च, ओजस्वी व आनंदमय करतां येतें, अशी रवींद्रबाबूंची शिकवण आहे.

रवींद्रनाथांच्या अमृतमय काव्यवाणीचे व अमर कीर्तीचे संगीत-ध्वनि श्रुतिपथावर येत असतां देहभान विसरून गेल्यास व त्या काव्य-सृष्टींतील चैतन्ययुक्त तत्त्वज्ञान अभावितपणें दृष्टीआड झाल्यास नवल नाहीं. अशा प्रकारचें दुर्लक्ष होऊं नये म्हणून सत्य, शुद्ध सत्य यावरच दृष्टी खिळावयास पाहिजे. जगाच्या अंतिम कल्याणाच्या दृष्टीनें व्यक्तीच्या तत्त्वज्ञानाला, व कल्पनेपेक्षां सत्याला अधिक महत्व दिले पाहिजे. रवीं-द्रनाथ टागोरांचा जगाला असाच संदेश आहेः—

" व्यक्तीचें स्तोम माजावितांना परम सत्याची अवहेलना करूं नका, "

श्रीकृष्णार्पणमस्तु

समाप्त.

# राष्ट्रगीत

( रवींद्रनाथ टागोर-कृत )

## जय हे भारत-भाग्य-विधाता !

जनगण-मन-अधिनायक जय हे भारत-भाग्य-विधाता !
जय हे, जय हे, जय जय तुज, अभिनव-भारत-नाथा !

सिंधु, पंच, गुजराथ, मराठा, द्राविड, उत्कल, बंग;
विंध्य, हिमाचल, यमुना, गंगा, पूनित-जलधि-तरंग;
हीं तव नामें जागीं
होउनि आशिलागीं
गाती तव जयगाथा.
जनगण-मंगल-दायक जय हे भारत-भाग्य-विधाता !

ऐकुनि वाणी तव होती त्या नित्य प्रचारित नादीं
हिंदु, बौद्ध, शिख, जैन, पारसिक, ख्रिती, मुसलमानादि;
पश्चिम पूर्व मिळोनि
प्रेमहार गुंफोनी
अर्पिति तुज निज हातां
जनगण-ऐक्य-विधायक जय हे भारत-भाग्य-विधाता !

पतन-अभ्युदय-बंधुर-मार्गी युगिं युगिं धावति यात्री,
चिरसारथि ! तव रथचक्रें हो मुखरित पथ दिनरात्रीं;

जैं क्षय–विप्लव माजे
तव शंखध्वनि गाजे
' संकट–दुःख त्राता '
जनगण–दुःख–त्रायक जय हे भारत–भाग्य–विधाता !

घोर–तिमिर–घन–निबिड–निशीथीं, पीडित–भेसुर–कालीं,
जागृत राहुनि आनिमिष–नयनीं निज पुत्रां सांभाळीं
दुःस्वप्नीं, आतंकीं,
घेउनि त्यांना अंकीं;
स्नेहमयी तूं माता !
जनगण–पथ–परिचारक जय हे भारत–भाग्य–विधाता !

प्रभात होउनि दिसत रवि–छवि पूर्व–उदय–गिरि–भालीं,
गाइ विहंगम, पुण्य समीरण नव–जीवन–रस घाली;
तव करुणारुण–रागें,
भारत होउनि जागे
ठेवी तव पदिं माथा
जय हे, जय हे, जय राजेश्वर भारत–भाग्य–विधाता !
जय हे, जय हे, जय जय जय तुज, अभिनव–भारत–नाथा !

( ना. म. भिडे. )

## रवींद्र-वाङ्मय-सूची

रवींद्रनाथ टागोरांच्या अवाढव्य वाङ्मयसृष्टीची कल्पना येण्यासाठीं त्यांच्या बंगाली व इंग्रजी ग्रंथांची सूची प्रसिद्धीच्या वर्षासह पुढें दिली आहेः—

### बंगाली ग्रंथ

**काव्यः—**

| ग्रंथ | वर्ष |
|---|---|
| कविकाहिणी | १८७८ |
| गाथा | ,, |
| भानुसिंग ठाकुरेर पदावली | १८८४ |
| संध्यासंगीत | ,, |
| प्रभात संगीत | ,, |
| शैशव संगीत | ,, |
| छवि ओ गान | ,, |
| पदरत्नावली | १८८५ |
| मानसी | १८९१ |
| विदाय–अभिशाप | १८९५ |
| छेलेभुलान छडा | ,, |
| सोनार तरी | ,, |
| चित्रा | १८९६ |
| चैताली | ,, |
| नदी | ,, |
| काव्यग्रंथावली | ,, |
| कणिका | १८९९ |
| कथा | १९०० |
| काहिणी | ,, |
| कल्पना | ,, |
| क्षणिका | ,, |
| नैवेद्य | १९०१ |
| काव्यग्रंथ | १९०४ |
| उत्सर्ग | ,, |
| स्वदेशसंकल्प | ,, |
| स्मरण | ,, |
| शिशु | ,, |
| खेया | १९०६ |
| गान | १९०८ |
| छुटिर पद | १९०९ |
| गीतांजली | १९१० |
| धर्मसंगीत | १९१२ |
| काव्यग्रंथ | १९१४ |
| गीतिमाल्य | ,, |
| गीताली | ,, |
| वसंत–उत्सव | १९१५ |
| बलाका | १९१६ |
| पलातका | १९१८ |
| गीतपत्र | ,, |
| गीतपंचाशिका | ,, |
| वैतालिका | ,, |
| शेफाली | १९१९ |
| गीतालेखा | ,, |

| | |
|---|---|
| केतकी | ,, |
| गीतिवीथिका | १९१९–२० |
| काव्यगीती | ,, |
| अरूपरत्न | १९२० |
| शिशु भोलानाथ | १९२२ |
| लिपिका | ,, |
| पदसंकलन | १९२४ |

### नाटक

| | |
|---|---|
| रुद्रचंद्र | १८८१ |
| भग्नहृदय | ,, |
| वाल्मीकी–प्रतिभा | १८८३ |
| नलिनी | १८८४ |
| कालमृगया | १८८५ |
| मायार खेला | ,, |
| प्रकृतेर प्रतिशोध | ,, |
| राजा ओ राणी | १८८९ |
| वैकुंठेर खाता | १८९१ |
| विसर्जन | १८९२ |
| चित्रांगदा | ,, |
| हास्यकौतुक | १९०७ |
| व्यंग कौतुक | ,, |
| शारदोत्सव नाटिका | १९०८ |
| मुकुट | ,, |
| प्रहसन | ,, |
| प्रजापतिर निर्बंध | ,, |
| प्रायश्चित्त | १९०९ |
| राजा | १९१० |
| अचलायतन | १९१२ |
| डाकघर | ,, |
| फाल्गुनी | १९१६ |
| ऋणशोध | १९२१ |
| मुक्तधारा | १९२२ |
| वसंत | १९२४ |

### कादंबरी

| | |
|---|---|
| करुणा | १८७८ |
| वाई ठाकुराणीर हाट | १८८४ |
| राजर्षि | १८८५ |
| छोटा गल्प | १८९४ |
| कथाचतुष्टय | ,, |
| विचित्र गल्प | ,, |
| गल्पदशक | १८९५ |
| गल्पगुच्छ | १९०० |
| चोखेरवाली | १९०३ |
| नौकाडुबी | १९०६ |
| गोरा | १९०९ |
| आठीगल्प | १९११ |
| गल्पचरत्ती | ,, |
| चतुरंग | १९१७ |
| घरे वाहिरे | १९१८ |

### निबंध

| | |
|---|---|
| युरोप प्रवासीर पत्र | १८८१ |
| आलोचना | १८८३ |
| विविध प्रसंग | १८८३ |
| राममोहन राय | १८८५ |
| समालोचना | १८८६ |
| युरोपयात्रीर डायरी | १८९१ |

औपनिषद् ब्रह्म १९०१
भारतवर्ष १९०६
देशनायक ,,
आधुनिक साहित्य १९०७
प्राचीन साहित्य ,,
लोकसाहित्य ,,
गद्यग्रंथ १९०८
शांतिनिकेतन (सत्रा ग्रंथ) १९०८-१६
स्वदेश १९०८
राजाप्रजा ,,
शिक्षा ,,
समूह ,,
साहित्य ,,
समाज ,,
धर्म १९०९
शब्दतत्त्व ,,
छिन्नपत्र १९१२
पाठसंचय ,,
जीवनस्मृति ,,
संचय १९१६
जापानयात्री १९१९
पयलानंबर १९२०
पंचभूत
भक्तवीणा
विचित्र प्रबंध
इंग्रजी पाठ
इंग्रजी सोपान
संस्कृत सोपान
गीतिलिपि इ०

**इंग्रजी**

Glimpses of Bengali Life 1913
Gitanjali ,,
Glimpses of Bengali Life ,,
The Crescent Moon ,,
Chitra 1914
Sadhana ,,
The King of the Dark Chamber ,,
The Post Office ,,
One Hundred Poems of Kabir 1915
Short Stories ,,
Stray Birds 1916
Fruit-Gathering ,,
Lover's Gift and Crossing 1917
Sacrifice and Other Plays ,,
The Cycle of Spring ,,
Letters ,,
Nationalism ,,
Personality ,,
My Reminscences ,,
Stories from Tagore 1918
Stories of Tagore ,,

## कवींद्र रवींद्रनाथ टागोर

| | | | |
|---|---|---|---|
| Mashi and Other Stories | ,, | The Wreck | ,, |
| The Parrot's Training | ,, | Creative Unity | 1922 |
| Mother's Prayer | 1919 | Gora | 1923 |
| Letters from an On-looker | ,, | The Curse at Farewell | 1924 |
| Autumn-Festival | ,, | Letters from Abroad | ,, |
| Greater India | ,, | Lectures in China | 1925 |
| The Centre of Indian Culture | ,, | Lectures in Japan | ,, |
| Sakuntala | 1920 | Red Oleanders | ,, |
| Fugitive | 1921 | Poems | ,, |
| Thought Relics | ,, | Broken Ties and Other Stories | ,, |
| Glimpses of Bengal | ,, | The Religion of Man | 1930 |

---

"उदात्त ध्येयावर दृष्टी ठेवून माझे देशबांधव जो लढा चालवीत आहेत त्याबद्दल मला अत्यंत अभिमान वाटतो. हिंदुस्थानाचें हें उदाहरण जगाला मार्गदर्शक झाल्यावांचून रहाणार नाहीं."

—रवींद्रनाथ टागोर